

श्री वे.मु.रमेश रामलिंग स्वामी हरंगुळकर ये महाराष्ट्रमें धर्म प्रसार का कार्य करते है। यह सुनकर खुशी हुई। इन्होने आजतक भजन, किर्तन एवं प्रवचन उपयोगी साहित्य का निर्माण किया है और पौरोहीत्य पढनेवालों के लिये छोटी छोटी किताबे निकालकर नई पिढी के लिये बहुत बडा योगदान किया है और आज जंगम वर्गको जानकारी मिलने के लिये ' वीरशैव लिंगीब्राम्हण दशकर्म पद्धती ' इस ग्रंथ का ११२ साल के बाद पुन: प्रकाशन का कार्य कर रहे है। इसी तरह का प्रसार कार्य करणे के लिये इनको शिवप्रभू आयुरारोग्य देकर इनके प्रसारकार्य की उन्नती करे ।
ऐसा उज्जैन जगत्गुरू का मंगल आर्शिवाद ।

श्री उज्जैन महास्वामिन.

श्री श्री श्री १००८ सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी
उजयिनी ता. कुडलगी जि. बल्लारी (कर्नाटक)



श्री वे.मु.रमेश रामलिंग स्वामी हरंगुळकर यांच्या व्दारा प्रकाशित
होणारा ग्रंथ ' वीरशैव लिंगीब्राम्हण दशकर्म पद्धती '
हा ग्रंथ अत्यंत दुर्मिळ असून या ग्रंथाचे आतापर्यंत कोणीहि पुर्नप्रकाशन
केले नाही. हा ग्रंथ इ.स. १९०६ रोजी प्रकाशीत झाला होता. त्यानंतर
ग्रंथ प्रकाशित झाला नाही. या ग्रंथा मधे सोळा संस्कारापैकी दहा
संस्कार गर्भाधान विधी पासून अत्येंष्ठी पर्यंतचा विधी सांगितला आहे.
यापुर्वीही वे.मु.रमेश रामलिंग स्वामींनी अनेक ग्रंथ लुप्त होत असलेले
त्यांनी प्रकाशित केले आहे. हा ग्रंथ ११२ वर्षा नंतर आपणा समोर
आणला आहे. या ग्रंथाचे प्रकाशन हिरेमठ संस्थान औसा येथे
श्री श्री श्री १००८ सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी उज्जयिनी
यांच्या हस्ते झाले आहे.

**श्री ष.ब्र.१०८ शांतवीरलिंग शिवाचार्य महाराज औसेकर**
**ता. औसा जि. लातूर (महाराष्ट्र)**

रावसाहेब मल्लप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध
झालेली वीरशैव लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

# वीरशैवलिंगिब्राह्मण
# दशकर्मपद्धति

: लेखक :

वेदमूर्ति, मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

....

वीरशैवलिंगिब्राह्मण
दशकर्मपद्धति.

प्रकाशन :
शिवशक्ती प्रतिष्ठान
हरंगुळ (बु.), ता. जि. लातूर
मो. ९८८१६३०६५३



मुद्रक :
आर. आर. प्रिंटर्स, गांधी मैदान, लातूर
मो-९४२२४६९३००

मूल्य : रु. १२५.००

नोट : या ग्रंथातील मजकुराशी प्रकाशक, अक्षर मांडणी व मुद्रक सहमत असतीलच असे नाही. सदरील ग्रंथामध्ये काही चुका आढळल्या तर कृपया वाचकांनी त्या प्रकाशकांना कळवाव्यात. दुसऱ्या आवृत्तीत त्यामध्ये निश्चित सुधारणा केली जाईल.

।। श्री गुरू प्रसन्न ।।

# प्रस्तावना

वेद, उपनिषदें, आगम, पुराणें, स्मृति, यांतील मार्गाला अनुसरून चालणारे ते हिंदु होत. या हिंदुलोकांमध्यें प्राकृत ब्राहाण व अप्राकृत ब्राह्मण असे ब्राह्मणांतील दोन भेद आहेत. त्यांत ब्रह्मदेवानें रचलेल्या वर्णाश्रम धर्माला अनुसरून चालणारे ते प्राकृत ब्राह्मण होत आणिं साक्षात श्रीपर शिवानें रचलेल्या वर्णाश्रमधर्माला अनुसरून चालणारे ते अप्राकृत ब्राह्मण (वीरशैव) होत. गर्भाधानादि षोडशकर्मे, (मुख्यत्वेंकरून दशकर्मांचे संस्कार) यजनादि षट्रकर्मे, पंचयज्ञ, अष्टावरणें, भक्तादि षट्स्थलें, पंचाचार वगैरे कर्मे होत. या कर्मांपैकीं गर्भाधानादि दशकर्मे या पुस्तकांत दिली आहेत. यांतील प्रत्येक विषयाचें ज्ञान करून घेण्याची इच्छा असेल त्यांनी विषयानुक्रमणिका पाहावी. त्यांतल्यात्यांत दीक्षाविधीसंबंधानें कित्येकांचे आक्षेप येण्याचा संभव आहे, याकरितां यथाशक्ति येथें विवेचन करणें जरूर वाटल्यावरून थोडक्यांत दिग्दर्शन करतों.

''वैराग्यज्ञानयुक्तानां योगिनां स्थिरचेतसाम् ।। अंतर्लिंगानुसंधाने शुचिर्बाह्येन जायते ।। तस्मावप्रयत्नेन गुरूणा शरत्रवेदिना ।। अनुग्रहाय यद्दत्तं तल्लिंगं पूजयेत्सदा ।।'' या लिंगपुराणांतील वचनाला अनुसरून विरक्त, मुमुक्ष, बुद्धिमान स्थिरचित्त अशा योग्यांना आंत (मनांत) लिंगांगसा मरस्यज्ञान असलें तरी बाहेर शुद्धि व्हावयाची नाहीं याकरितां सर्वप्रयत्नांनी शिवजीवैक्यज्ञानसंपन्न गुरुवर्यानें अनुग्रहपूर्वक दिलेलें शिवलिंग धारण करून त्याची पूजा करावी, असें सिद्ध होते. शिवाय ''अमृतस्य देवधारणो भूयासं'' या श्रुतीवरूनही हाच अर्थ सिद्ध होतो तर तें शिवलिंग जन्मतांच गळ्यांत बांधण्याविषयीं अनेक आधार असल्यामुळें तेव्हांच बांधीत असतात. तर पुन: ८ व्या वर्षी दीक्षेच्या वेळेस शिवलिंग धारण कां करांवे? अशी शंका येण्याचा संभव आहे, याकरितां असें प्रमाण आहे की ''गर्भाष्टमे कृता दीक्षा मुख्या सा षोडशावधि ।।'' या वचनाला अनुसरून दीक्षाही ८ व्या वर्षी केली पाहिजे असें सिद्ध होतें. शिवाय ''दीक्षा'' या शब्दाचा अर्थ असा आहे कीं ''दीयते ज्ञानसंबंध: क्षीयते च मलत्रयम्'' या वचनावरून दीक्षा म्हणजे ज्ञान देणारें व आणव, मायिक, कार्मिक मलत्रयांचा नाश करणारें कर्म असें

सिद्ध होतें. असे हें. कर्म (संस्कार) ८ व्या वर्षी मंत्रोपदेशास योग्य काल असल्यामुळें करतात. जन्माच्या वेळेस मंत्रोपदेश करतां येत नाहीं यामुळें हा पुढील मंत्र म्हणून शिशूच्या गळ्यांत सुखेनैव यावद्दीक्षावसानकं'' हाच मंत्र होय. या वचनावरून बाल्यावस्थेमध्यें परमेश्वर शयनावस्थेंत असतो असें होतें. या वचनावरून बाल्यावस्थेमध्यें परमेश्वर शयनावस्थेंत असतो असें होते. नंतर पुढें दीक्षेच्या वेळेस तयाच परमेश्वरास जाग्रदवस्थेंत आणून त्याची पूजा करावी लागते. म्हणूनच त्यावेळेस मंत्रोपदेशपूर्वक शिवलिंग सदुरू देतात. ते पूर्वीचेंच (शिवलिंग) होय. असो. या दशकर्मातील मुख्य तात्पर्य समजण्याकरितां मराठी अर्थ दिला आहे. याशिवा आणखी कांहीं सूचना असतील तर ते सुचविल्यास दुसऱ्या आवृत्तीच्या वेळेस सुधारणा करूं.

वीरशैवांस जन्मल्यापासून शेवटपर्यंत संस्कार काय काय होत असतात ते संस्कार सर्व एकत्र आणून एक ग्रंथ तयार करावा अशी सूचना श्रीमंत रावसाहेब अप्पासाहेब वारद यांनी केल्यामुळें पुष्कळ परिश्रम करून अनेक वीरशैवसिद्धांतग्रंथांच्या आधारांनीं हा ग्रंथ तयार केला आहे. जाहिरातींत ''षोडशसंस्कार म्हणून काय नांव दिलें आहे त्या षोडशकर्मापैकीं रूढींत दशसंस्कारच मुख्यत्वेंकरून प्रसिद्ध असल्यामुळें'', ''दशकर्म-पद्धति'' (यात अंत्यसंस्काराशिवाय सर्व संस्कारही आहेत.) हें नांव देण्यास श्रीमंतांनी सुचविलें होतें म्हणून हेंच नांव दिलें आहे. या पुस्तकात प्रत्येक संस्काराचा शास्त्रोक्त निर्णय व त्यापुढें प्रयोग असा क्रम ठेवला आहे.

या पुस्तकांचे मराठी तात्पर्य रा.रा. त्रिंबक गुरूनाथ काळे यांनी केलें आहे व प्रूफतपास शुद्धाशुद्धपत्रक वगैरे कामें वे ।।मू।। मल्लिकार्जुन शास्त्री जैनापूर वे ।।मू।। जगदीशशास्त्री नालवार वे.शा.सं. रंगाचार्य शास्त्री मुधोळकर यांनी केली आहेत या सर्वांचे आम्ही आभारी आहोंत.

**प्रसिद्धकर्ता**

॥ श्री गुरू प्रसन्न ॥

# प्रस्तावना (दुसऱ्या आवृत्तीची)

बरोबर १११ वर्षांनी हा ग्रंथ पुनर्मुद्रित करण्याचा योग आलेला आहे. संपादक रामलिंग स्वामी यांचा हा बऱ्याच वर्षाचा संकल्प आज सिद्धिस जात आहे आणि मलाही दुर्मिळ ग्रंथ संग्रह करण्याचा छंद असल्यामुळे वारद संग्रहातील पुस्तके संग्रह करण्याचा प्रयत्नात असल्यामुळे या पुस्तकाची एक झेरॉक्स प्रत नागेश स्वामी कुरूंदवाडीकर यांच्याकडून प्राप्त झाली. दुसरी छापील प्रत श्री ओमकार स्वामी (झिरोफाटा ता. वसमत यांच्याकडे असल्याचे समजले पण प्राप्त झाली नाही.)

श्री रामलिंग स्वामी पण या ग्रंथाच्या शोधात होतेच. त्यांना कोणत्यातरी एका मठात या पुस्तकाची त्रुटीत प्रत मिळाली होती पण ती हस्तगत झाली नाही.

शेवटी आमचे एक किर्तनकार मीत्र श्री राजेश्वर स्वामी लाळीकर यांच्याकडून श्री रामेश्वर स्वामी कोदळीकर यांच्याकडे अनेक दुर्मिळ ग्रंथाचा संग्रह असल्याचे समजले. राजेश्वर स्वामी यांच्या प्रयत्नाने रामेश्वर स्वामीनी हा ग्रंथ आम्हाला घरपोच आणून दिला. या शिवाय वारद प्रकाशनाचे कांही ग्रंथ एका शिवाचार्यांना देण्यात आल्याचे त्यांनी सांगितले व ते मागूनही परत मिळत नाहीत यांची खंत व्यक्त केली.

सोलापूरच्या वारद घराण्याने 'संस्कृत पाठशाला' व दुर्मिळ वीरशैव ग्रंथाचे पुनर्मुद्रण व अनेक विद्वान व्यक्तिकडून ग्रंथ लेखन करून समाजाला अल्प किमतीत वितरीत केले. वारदानंतर ही पाठशाला व ग्रंथ प्रकाशन बंद पडले.

महाराष्ट्रात आजही वीरशैव धनवान घराणी असतील पण वारदाचा धर्मनिष्ठपणा त्यांच्या अंगी अभावानेच आहे. यानंतर कांही शिवाचार्य व कांही जगद्गुरू दुर्मिळ ग्रंथ प्रकाशन करीत आहेत हा स्तुत्य उपक्रम आहे.

वीरशैव धर्मात 'जंगम' हा वर्ग पौरोहित्य करणारा तर आहेच पण वीरशैव मठ परंपरा अबाधीत ठेवण्यासाठी पुत्र संतती अर्पण करणारा ही आहे. जंगमाच्या ह्या त्यागावरच मठ परंपरा टिकून आहे.

पण आजचा जंगम वर्ग कालमानाप्रमाणे बदलून शिक्षण व नोकरीकडे

वळलेला दिसत आहे पण ही पोकळी भरून काढण्यासाठी जंगम वर्गही संघटीत होऊन पौरोहित्यात समानता आणण्याचा प्रयत्न करीत आहे. यात प्रामुख्याने कोल्हापूर, सातारा, सांगली, नांदेड हा भाग अग्रेसरही आहे.

जंगमाच्या पौरोहित्यासाठी जी ग्रंथ संपदा लागते त्याचा अभावच आहे गेल्या शतकात लातूरच्या देशिकेंद्रमहाराजानी 'वीरशैव व विवाह विधी' वरदा शंकर (वीरशैवपर) ग्रंथ रचना केली होती व सांप्रत श्रीगुरू ष.ब्र. १०८ निळकंठ शिवाचार्य महाराज धारेश्वरकर यांनी वीरशैव संस्कारार्थ पुस्तके तयार करून फार मोलाची भर टाकलेली आहे.

'वीरशैव दशकर्म' पद्धती हा एक जंगम वर्गासाठी 'अमोलिक' असा ग्रंथ आहे सर्वच धर्मात गर्भाधानापासून अत्यंष्टीपर्यंत सोळा संस्कार आहेत. गर्भाधान, पुरावन, सीमंतोन्जयन, अनवलोमन, जातकर्म, नामकरण, आंदोलारोहण

दुग्धप्राशन, सुर्यचंन्द्रावलोकर, निष्क्रमण, कर्णवेध, अन्नप्राशन, चौल, विद्यारंभ, दिक्षा, विवाह व अंत्यष्टी अशीही षोडशकर्मे आहेत पण यापैकी मुख्य दहाच आहेत तेच या पुस्तकात दिलेली आहेत.

गेल्या शंभर वर्षात 'जंगमाला', 'लिंगी ब्राह्मण' म्हणण्याचा प्रचार झाला याचे कारण इ.स. १९३० च्या सुमारास 'परळी' (मराठवाडा) या गावी विकाराबादचे (हैद्राबाद संस्थान) 'शिवकोटी वीरभद्रस्वामी हे विद्वान गृहस्थ ज्योतिर्लिंगाच्या सान्निध्यात चातुर्मास अनुष्ठानासाठी आले.' या गावी वीरशैवाची अनेक श्रीमंत घराणी आहेत. सदरी स्वामीनी काशी, त्र्यंबकेश्वर येथे दोन वर्षाचे अनुष्ठान करून परळीला आले. अनुष्ठान संपन्न झालो शेवटी ज्योतिर्लिंगाला 'महारूद्राभिषेक' करण्याचा संकल्प झाला पण ऐन अभिषेक प्रसंगी तेथील उपाध्याय ब्राह्मण वर्गानी रूद्राभिषेक बंद पाडला. कारण जंगमानी 'रूद्राध्याय' म्हणूनये हा त्यांचा आग्रह; कारण वीरशैव धर्म कोणतेही सूतक पाळीत नाहीत व मानत नाहीत म्हणून ते अवैदिक आहेत असा त्यांचा आग्रह होता. 'रूद्राध्याय म्हणण्याचा अधिकार फक्त ब्राह्मणालाच आहे अशी त्यांची भूमिका.

'वीरभद्रस्वामीनी मंदिरातच अन्नत्यागाचा संकल्प करून बैठक मारली तीनवर्षे निझाम दरबारी झगडून-अनेक वीरशैव पुढाऱ्यांच्या व विद्वानाच्या मदतीने १९२५ साली 'जंगमालाही' यजूर्वेदिय रूद्र पठणाचा अधिकार आहे. जंगम हा

वर्ण 'लिंगी ब्राह्मणच' आहे. असा निकाल 'निझाम हाय कोर्टाने दिला तेंव्हा १२१ जंगमानी ११ दिवस राहून वैद्यनाथाला दूधा तूपाचा अभिषेक केला. मगच वीरभद्र स्वामीनी अन्न ग्रहण केले आजही त्यांचा पुतळा मुख्य द्वारात आहे. ही घटना परळीचे नागनाथ आप्पा हलगे यांनी मला १९६५ ला कपिलधार क्षेत्री सांगितली होती. तेंव्हापासून जंगमाला 'लिंगी ब्राह्मण' म्हणू लागले म्हणूनच या पुस्तकाच्या लेखकांनी 'वीरशैव लिंगी ब्राह्मण दशकर्म पद्धति' हे नाव दिले.

यात प्रामुख्याने दहाच संस्काराचा विधी सांगितलेला आहे. कारण जंगम वर्गाकडे दहाच संस्कार करावयाचे आहेत. बाकीचे सहा संस्कार आपापल्या घरीच करावयाचे आहे.

मुळ पुस्तकात 'अंत्येष्टी' हा संस्कार विधी दिलेला नाही पण आम्ही तो संस्कारही अनेक ग्रंथाच्या आधारे तयार करून येथे छापलेला आहे.

पौरोहित्य करणाऱ्या जंगम वर्गानी गर्भाधान, जातकर्म (लिंग बांधणे) दीक्षा विधी, विवाह विधी व अंत्येष्टी यथासांग करता यावी हा 'पींड' धर्मानुकूल वागावा हा प्रयत्न आहे.

शि.बा. स्वामी
मानखेडकर

# ॥ ग्रंथ संग्राहक ॥



श्री माहेश्वर मूर्ती मन्मथ लिंगय्याप्पा मठपती (स्वामी) रा. कोदळी ता. उदगीर.

यांना वीरशैव धार्मिक पुस्तके संग्रहाचा व वाचनाचा चांगला अभ्यास होता. यांच्याकडे आद्यापही वारद ग्रंथ मालेचे अनेक ग्रंथ संग्रहीत आहेत. या शिवाय मन्मथादि संताचे गबाळ; आरत्या, पदे, इत्यादिचा संग्रह आहे. त्या काळी सोलापूरच्या आप्पासाहेब वारदानी पाच ग्रंथ संग्रह व ग्रंथ प्रेम पाहून सोलापूर येथे सत्कार केला होता.

त्यांचेच चिरंजिव रामेश्वर मन्मथ स्वामी यांना पण ग्रंथ संग्रहाचा छंद असून वडिलांचा सर्व संग्रह त्यांच्याकडेच उपलब्ध आहे. त्यांनीच हा सदरील ग्रंथ दिल्यामुळे सदरील पुस्तकाचे पुनर्मुद्रण होऊ शकले. हा ग्रंथ (जंगम) वर्गासाठी वीरशैवाचे धर्मसंस्कारादि विहित कर्म करण्यासाठी अत्यंत उपयुक्त असा हा ग्रंथ आहे. हा ग्रंथ दान दिल्यामुळे सर्व समाज त्यांचा सतत ऋणी राहिल सदरील स्वामी कीर्तनकार पण आहेत.

## ग्रंथ प्राप्तीस साह्यकर्ता



श्री माहेश्वर मूर्ती राजेश्वर स्वामी लाळीकर हे वीरशैव सांप्रदायाचे कीर्तनकार असून महाराष्ट्र वीरशैव कीर्तन संघटनेचे 'सचिव' या पदावर कार्यरत आहेत. ग्रंथ मिळवण्यासाठी यांचा फार मोलाचा सहभाग आहे.

***

**दशकर्मपद्धतींतल्या मराठी टीकेंतील कठिण शब्दांचा अर्थ.**

| | | |
|---|---|---|
| प्रथमऋतु | - | पहिला विटाळ |
| रति | - | विषयसुख |
| योगक्षेम | - | उपजीविका |
| शकृत्पिंडांत | - | शेणाच्या गोळ्यांत |
| विशाल | - | मोठें |
| कूर्च | - | दर्भानें केलेली काडी |
| लाजा | - | भाताच्या लाह्या |
| पालाशदंड | - | पळसाची काठी |
| बटुं | - | ब्रह्मचारी |
| विष्टर | - | दर्भांनी केलेलें आसन |

# दशकर्मपद्धतीची अनुक्रमणिका

## दशकर्मपद्धतीचे संस्कृत शुद्धाशुद्धपत्रक

| अशुद्ध | शुद्ध | पान | पंक्ति |
|---|---|---|---|
| पूजासाद्गुण्यांर्थ | पूजाषाड्गुण्यार्थ | ११ | ८ |
| साम | सोम | ० | |
| वैदिकाषिशो | वैदिकाशिषो | | |
| यप्रोगः | प्रयोगः | | |
| बृहत्साम् | वृहत्साम | | |
| क्रारयेत् | कारयेत् | | |
| अथा | अथ | | |
| अफलऽअपुष्पा | अफला अपुष्पा | | |
| क्रकर | कृकर | | |
| दीक्षापपर्यंत | दीक्षापर्यंत | | |
| मुहुर्त् | मुहूर्त | | |
| तंदुला | तंडुला | | |
| मौर्जी | मौंजी | | |
| वृध्द्यु | वृध्द्य | | |
| ऋभ्द्या | ऋध्द्या | | |
| हवेःँ | हवे | | |
| मिद्रं | भिद्रं | | |
| विचर्षिणिः | विचर्षणिः | | |
| यज्ञीये | यज्ञिये | | |
| विकीर्य्य | विकीर्य | | |
| कम | कर्म | | |
| द्वारी | द्वारि | | |
| यज्ञीय | यज्ञिय | | |
| सुपु | सुपूर | | |
| सोऽस्य | सो अस्य | | |

| | |
|---|---|
| पात्राण्युता | पात्राण्युत्ता |
| सीदामीयुक्त्वा | सीदामीत्युक्त्वा |
| द्विलं | द्विलं |
| स्तिष्टुप् | स्त्रिष्टुप् |
| ममः | नमः |
| यखेयति | यखेति |
| भ्यश्रं | भ्यक्षं |
| अष्टत्रिशत् | षट्त्रिंशत |
| अचरं | अजरं |
| दर्वी | दर्वि |
| भूतांयशो | भूतांशो |
| हिष्टा | हिष्ठा |
| दर्वी | दर्वि |

ॐ

## श्रीवीरशैवगर्भाधानादिविधयः।

श्रीगणेशाय नमः।। हर ॐ वीरशैवाचारकौस्तुभे।। वीरशैवस्य गर्भादिसंस्कारविधयः क्रमात्।। समाध्यंताः प्रवक्ष्यंते ज्ञानयोगानुकूलतः।।१।। विद्वत्कल्पतरो चेतः श्रोतुमुत्कंठते मम।। गर्भाधानादिसंस्कारान् वीरशैवोपजीविनाम् ।।२।। श्रृणु मंत्रिकुलोत्तंस वीरशैवोचितक्रियाः।। प्रथमर्तौ त्र्यहादूर्ध्वमाषोडशदिनावधि ।।३।। युग्मे ज्योतिःशास्त्रसिद्धे शोभने दिवसे बुधः।। कुर्वीत गर्भाधानाख्यं संस्कारमिति तद्विदुः।।४।। नारदीये।। यावंतो ऋतवस्तस्याः समतीयुः पतिं विना।। तावत्यो भ्रूणहत्याः स्युस्तस्या यो नाददाद्रतिम् ।।५।। भ्रूणहत्येति गर्भहतिः।। याज्ञवल्क्यः।। षोडशर्तुर्निशाः स्त्रीणां तासु

श्रीगणेशाय नमः।

### अथ गर्भाधानविधि :।

(१) वीरशैवाचारकौस्तुभांत असे लिहिलें आहे कीं, क्रमेंकरून वीरशैवांचे गर्भाधानादि विधीपासून ज्ञानयोगाच्या आनुकूल्यानें समाधींपर्यंत विधि कथन केले जातील (२) हे विद्वानांमधील कल्पवृक्षा! माझें मन वीरशैवांचे गर्भाधानादि विधि ऐकण्यास उत्सुक झालेलें आहे. (३) हे मंत्रिकुलोत्तमा! तुला त्या क्रिया सांगतो; तूं त्या श्रवण कर. प्रथम ऋतु ज्यावेळी प्राप्त होईल, त्यावेळी पहिले तीन दिवस सोडून देऊन सोळा दिवसपर्यंत (४) ज्योतिःशास्त्रसंमत व शुभ अशा एखाद्या सम (४-६-८-१०-१२-१४-१६-) दिवशीं, शाहण्यानें गर्भाधानाख्य कर्म करावें (५) नारदीयग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, जितके जितके दिवस ह्मणून स्त्रीचे ऋतुकाळी पतीच्या शिवाय जातील, तितक्या तितक्या भ्रूणहत्या (गर्भघात) तिला रति न देणा-या तिच्या नव-याच्या माथीं लागतील. (६) याज्ञवल्क्यानें याविषयीं युग्मासु संविशेत्।।६।। तत्र मनुः।। युग्मासु पुत्रो जायेत स्त्रियोऽयुग्मासु

रात्रिपु।। तस्माद्युग्मासु पुत्रार्थी संविशेदार्तचे स्त्रियम्।।७।। व्यासः।। रात्रौ चतुर्थ्यां पुत्रः स्यादल्पायुर्धनवर्जितः।। पंचम्यां पुत्रिणी नारी षष्ठ्यां पुत्रस्तुं मध्यमः।।८।। सप्तम्यां सुभगा योषिदष्टम्यामीश्वरः सुतः।। नवम्यां सुभगा दारा दशम्यां तु वरः पुमान्।।९।। एकादश्यामधर्मा स्त्री द्वादश्यां पुरुषोत्तमः।। त्रयोदश्यां सुता चेत्स्यात् वर्णसंकरकारिणी।।१०।। धर्मज्ञश्च ह्यात्मवेदी दृढव्रतः।। प्रजायते चतुर्दश्यां गुणौंधो जगतीपतिः।।११।। राजपत्नी महाभागा राजवंशताथवा।। जायते पंचदश्यां तु बहुपुत्री पतिव्रता।।१२।। विद्यालक्षणसंपूर्णः सत्यवादी जितेंद्रियः।। आश्रयः सर्वभूतानां षोडश्यां जायते पुमान्।।१३।। ◆ तत्र निषिद्धदिनान्याह मनुः।।

असें लिहिलें आहे कीं, सोळा रात्रीपर्यंत स्त्रियांचा ऋतुकाळ असतो, त्या वेळीं कोणत्याही एकाद्या सम दिवशीं त्यांशीं संग करावा. (७) याविषयीं मनूनें असें लिहिलें आहे कीं, समरात्रींमध्यें (संग केला असतां) पुत्र होतो; व विषम (५-७-९-११-१५) रात्रींमध्यें (संग केला असतां) मुलगी होते; ह्मणून पुत्र व्हावा अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनी सम रात्रींमध्येंच संग करावा. (८) याविषयीं व्यास ह्मणतो कीं, चौथ्या रात्रीं जो पुत्र होतो तो अल्पायु व निर्धन होतों; पंचम रात्रीं पुत्रवंत नारी होते; सहाव्या रात्रीं मध्यम प्रकारचा पुत्र निपजतो. (९) सातव्यारात्रीं सौभाग्यवान् नारी होते; आठव्यां रात्री ईश्वरासमान पुत्र होतो. नवव्या रात्री सुभगा नारी निपजते व दहाव्या रात्री उत्तम पूत्र निपजतो. (१०) अकराव्या रात्रीं जी स्त्री निपजते ती मोठी अधर्मिष्ठ (कुलटा;, व्यभिचारिणी) निघते; बाराव्या रात्रीं उत्तम पुरुष निपजतो. तेराव्या रात्रीं जर कां स्त्री उत्पन्न झाली, तर ती मोठी व्यभिचारिणी होऊन, वर्णसंकर (एकजात) करून टाकील (११) चौदाव्या रात्रीं जो पुत्र उत्पन्न होतो तो धर्मज्ञ, कृतज्ञ, आत्मज्ञानी, दृढव्रत, सकलगुणसंपन्न, व जगतीपति होतो. (१२) पंधराव्या रात्रीं जी नारी उत्पन्न होते, ती मोठी भाग्यवान राजपत्नी, अगर राजवंशांत जाणारी (लग्नसंबंधानें) अशी होऊन, पुष्कळ पुत्र त्या पतिव्रतेला होतील.(१३) सोळाव्या रात्रीं जो पुत्र होतो तो सर्व विद्या व लक्षणें यांही युक्त, सत्य तेंच बोलणारा, जितेंद्रिय (इंद्रियें ज्यांनें ताब्यांत ठेविलीं

आहेत असा) सर्व प्राण्यांना आश्रय देणारा, असा निपजेल. (१४) याच बाबतीतं मनूनें निषिद्ध

**अमावस्याष्टमी चैव पूर्णमासी चतुर्दशी।। ब्रह्मचारी भवेन्नित्यमप्यतौं स्नातको भवेत्।।१४।। तासामाद्याश्चतस्त्रस्तु निंदिता द्वादशी तथा।। त्रयोदशी च शेषाः स्युः प्रशस्ता दश रात्रयः ।।१५।। एवं गच्छन् स्त्रियं ज्ञात्वा मघां मूलां च वर्जयेत् ।। स्त्रियो रक्ताधिके स्त्री स्यात्पुंसः शुक्लाधिके पुमान् ।।१६।। तस्माच्छुक्लविवृद्ध्यर्थं भक्ष्यं स्निग्धं च भक्षयेत् ।। गर्भाधानादिक्रियाणां कर्तृनिर्णयः।। शुद्धं मिश्रं च मलिनं पिण्डं त्रेधागमोदितम् ।।१७।। सिद्धांतशिखामणौ।। विशुद्धाः प्राकृताश्चेति द्विविधा मानुषाः स्मृताः ।। शिवसंस्कारिणः शुद्धाः प्राकृता इतरे जनाः।। एतेन मलिनानां वेदविरुद्धतंत्रोदितपांचरात्रादिमलिनधर्मः।। मिश्राणां वर्णाश्रमधर्मवतां पैतामहपुराणाद्युदीरितव्रतनियमोपवासकाम्यकर्माणि नित्यकर्माणि च ।। शिवाश्रमिणां शुद्धानां तु काम्यफलाभिसंधिरहितवेदागमोदितपरमेश्वराराधन-रूपाणि कर्माणि**

दिवस सांगितले आहेत; ते असे; - अमावस्या, अष्टमी, पौर्णिमा, व चतुर्दशी, या दिवशीं ऋतुमती स्त्री असली तरी ब्रह्मचारीच असावें; ह्मणजे स्नातक असलेल्याचें श्रेय प्राप्त होते. (१५) ऋतुकालांतील सोळा दिवसांपैकीं प्रथम चार व बारावी व तेरावी रात्र वर्ज्य व निंदित असें समजावें; व बाकी राहिलेल्या दहा रात्री प्रशस्त (चांगल्या) होत असें जाणावें. (१६) याप्रमाणे जाणून स्त्रीशीं संग करीत असतानां मघा व मूला हीं नक्षत्रें वर्ज्य करावीतं. स्त्रीचें रज अधिक होतां मुलगी होते; व पुरुषांचे वीर्य अधिक होता पुत्र होतो (१७) ह्मणून वीर्यवृद्ध्यर्थ स्निग्ध पदार्थ खावेत. (गर्भाधानादि कर्मांमध्यें कर्त्याचा निर्णय) पिंड शुद्ध, मिश्र व मलिन असे तीन प्रकारचे आहेत. (१८) सिद्धांतशिखामणींत ह्मटलें आहे कीं, विशुद्ध व प्राकृत (साधारण) असे दोन प्रकारचे लोक आहेत. शिवसंस्कारयुक्त जे लोक असतील ते विशुद्ध होत; व इतर सर्व प्राकृत होत. यायोगें वेदविरुद्ध तंत्रोदित पांचरात्रादिकांचा मलिन धर्म सुचविलेला आहे; तो मलिन (पिंडाचा) होय!

वर्णाश्रमधर्म असलेल्या मिश्र (पिंडाचे)- आजा-पणजांपासून अगर पुराणांपासून चालत आलेले व्रत, नियम, उपवास, काम्यकर्मे, व नित्यकर्मे हीं होत परंतु शिवाश्रम पावलेल्या शुद्ध (पिंडाचीं) कर्मे ह्मणजे, निष्काम व हेतुरहित, वेदादि ग्रंथोक्त, ईश्वराराधरूप कर्मेंच होत असा

**इति सिद्धांतशिखामणिवचनपर्यालोचनया गर्भाधानादिषु मंत्रलिंगात्फलाभिसंधिमतां कर्मणां त्याग इति।। तत्र तावन्नांदिपुण्याइवाचनादीनां पितृदेवताप्रीतिकराणां प्राकृतानां त्यागः।। वीरशैवपितृणांमुक्तानां तृप्तिकारणायोगेन वैयर्थ्यात्। शिवप्रसादेन नित्यपुण्याहवतां कर्मांगपुण्याहवैयर्थ्याच्च।। नियमस्य नित्यफलनिवर्तकत्वात्तन्नित्यफलं शिवप्रसादरूपो मोक्ष इति।। अथ गर्भाधनविधिः।। चतुर्थदिवसादूर्ध्वं मघामूलादिवर्जिते।। स्वगृहमुपलिप्य रंगवल्लिकया अलंकृत्य।। पूर्वेद्युः स्वस्तिवाचनं कृत्वा अपरेद्युर्यथाशक्ति माहेश्वरान् भोजयेत्।। दंपती गन्धमाल्यदिभिरलंकृत्य रात्रौ शयनकाले आसनप्राणायामौ कृत्वा तिथ्याद्युच्चार्य।। आवाभ्यां समस्तविद्यालक्षणसंपूर्णायुष्मत्पुत्रजननार्थं गर्भाधानं करिष्य इति संकल्प।। उभौ लज्जारहितौ रमेताम्।।**

सिद्धांतशिखामणीचा अभिप्राय जाणून गर्भाधानादि संस्कारांमध्यें मंत्रलिंगापासून फलप्राप्ति होईल अशी कामना ठेवून कर्मे करण्याचें वर्ज्यं करावें. या विषयीं नांदीपुण्याहवाचनादि पितृदेवतांनां तृप्त करणारीं कर्मे प्राकृतांनीं सोडून द्यावींत; कारण वीरशैवांचे पितर मुक्त झालेले असल्यामुळें त्यांची तृप्ति करावी लागत नसल्यामुळें व्यर्थ होय! शिवाच्या प्रसादानें त्यांनां दररोजच पुण्याह (शुभ, आनंदाचा दिवस) असल्यामुळें कर्मांने पुण्याह करणें अगदीं व्यर्थ होय! अप्राकृतांकरितां सांगितलेले पुण्याहप्रकार कालनियमादिकर्मांप्रमाणें करावेत. नियम धरिला ह्मणजे नित्यफल प्राप्त होत नाहीं; व नित्यफल ह्मणजे शिवप्रसादरूप मोक्ष होय. अथ गर्भाधानविधिः। चवथ्या दिवसापुढें मघा व मूळ ही नक्षत्रें सोडून देऊन, आपलें घर शेणानें वगैरे सारवून, रांगोळीच्या चित्रांनी अळंकृत करून मागच्या दिवशीं स्वस्तिवाचन (विधि) करून त्या दिवशीं यशाशक्ति माहेश्वरांस भोजन घालावें. दंपतीनें गन्धमालादिकानें अलंकृत होऊन रात्रीं शयनकाळीं

आसनप्राणायामादिक करून तिथ्यादिकांचा उच्चार करावा. नंतर असा संकल्प करावा :- आमच्यादोघांच्या योगें समस्त विद्यालक्षणयुक्त पुत्र तुझ्या ठायीं उत्पन्न व्हावा ह्मणून मी गर्भाधान करितों. नंतर दोघांनी लज्जा सोडूनअपरेद्युः स्नात्वा नित्यकृत्यानंतरं शुद्धासने उपविश्य पीडयित्वा सुगंधाया मूलं शुद्धांबरे निक्षिपेत् ।। उदीर्ष्यांतरित्यस्य सूर्यासावित्रीत्रिष्टुप् अनेन दक्षिणनासापुटे निनयेत्।। अनेन गर्भधारणं भवति।। शयनादुत्थिता नारी शुचिः स्यादशुचिः पुमान्।। इति गर्भाधानविधिः।।

यथेच्छ रममाण व्हावें. दुसरे दिवशी स्नान करून नित्यकृत्यानन्तर शुद्धासनी बसून सुगंधा वनस्पतीचें मूळ चांगले चोळून स्वच्छ कपड्यामध्यें घालावें. "उदी-र्ष्यांतरित्यस्य सावित्री त्रिष्टुप्" या मंत्रानें तें मूळ (मुळीचा रस) (स्त्रीच्या) दक्षिण (उजव्या) नाकपुडींत घालावे ह्मणजे यायोगे गर्भधारण होतें. शयनापासून उठलेली नारी शुद्ध व पुरुष अशुद्ध आहे असें जाणावें।। इति गर्भधारणं।

।। श्रीगुरुमेधादक्षिणामूर्तये नमः।।

## श्रीवीरशैवगर्भाधानविधीचा संस्कार सांगतों.

शुभ दिवशीं नवरा बायको दोघांनी मंगल स्नान करून भद्रपीठावर (आसनावर) बसून श्रीशिवाचें स्मरण करून "तदेव लग्नं" या मंत्राने शिवाच्या चरणाचें स्मरण करावें. (तदेव लग्नं याचा अर्थ) १ हे गौरीपतें, तुझें चरणयुगल स्मरणकरणें हेंच लग्न आहें, हेंच सुदिन आहे, ताराबल, चंद्रबल, विद्याबल, दैवबल, वगैरे सर्व कांही हेंच आहे, ह्मणून तुझ्या चरणाचें स्मरण करितों. (असें स्मरण करून) (२) "यः शिवो नामरूपाभ्यां" हा श्लोक ह्मणावा. उत्तम मुहूर्त असो,सुप्रतिष्ठित असो, असें ह्मणून "आगमार्थ" या मंत्रानें घंटानाद करावा.(आगमार्थं याचा अर्थ)(३) देवतांच्या आगमनाकरितां व रक्षासांच्या निर्ग-

श्रीगुरुमेधादक्षिणामूर्तये नमः।

## अथ श्रीवीरशैवगर्भाधानप्रयोगः।

गर्भाधानविधिं व्याख्यास्यामः शुभेऽहनि दंपती मंगलस्नातौ भूत्वा भद्रपीठोपरि उपविश्य

## ।। पुजारंभः ।।

।।हरः ॐ।। तदेव लग्नं सुदिनं तदेव ताराबलं चंद्रबलं तदेव।। विद्याबलं दैवबलं तदेव गौरीपते तेंऽघ्रियुगं स्मरामि।।१।। यःशिवो नामरूपाभ्यां या देवी सर्वमंगला।। तयोः संस्मरणात्पुंसां सर्वतो जयमंगलं ।।२।।

## ।। घंटानादः ।।

सुमुहूर्तमस्तु सुप्रतिष्ठितमस्तु।। आगमार्थं तु देवानां गमनार्थं तुरक्षसां।। कुर्याद्घंटारवं भक्त्या देवताह्वानलांछनं।।३।। नादशब्दमयीं घण्टां सर्वविघ्नापहारिणीं।। पूजयेदस्त्रमंत्रेण देवताह्वानलक्षणां।।४।। घण्टामूले तथा देवी गलोर्ध्वे शिरमूलके।। वसवः शूलमग्नस्थास्सर्वे वसतु शंकर।।५।। इति घण्टानादं कृत्वा।।

## ।। आचमनः ।।

ऋग्वेदाय स्वाहा यजुर्वेदाय स्वाहा सामवेदाय स्वाहा अथर्ववेदाय नमः।। इतिहासपुराणाय नमः।। अनंतताय नमः श्रीकण्ठाय नमः शिखंडिये नमः हृदयाय नमः शिरसे नमः शिखायै नमः कवचाय नमः नेत्रत्रयाय नमः अस्त्राय नमः।। इत्याचमनविधिः।। ।। अप उपस्पर्शः।। (हात धूऊन घेणे)

## ।। प्राणायाम्ः।।

ॐभूः ॐभुवः ॐ सुवःॐ महः ॐ जनः ॐ तपः ॐ सत्यं ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि।। धियो यो नः प्रचोदयात्।। ॐ आपो ज्योतीरसोमृतं ब्रह्मभूर्भवः सुवरोम्

## ।। संकल्पः।।

देशकालौ संकीर्त्य शुभे तिथौ शोभने मुहूर्ते आद्यब्रह्मणः द्वितीयपरार्धे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे कलियुगे, प्रथमपादे जंबूद्वीपे भरतवर्षे भरतखण्डे गोदावर्याः दक्षिणकूले शालिवाहनशके .... बौद्धावतारे शिवक्षेत्रे.... अस्मिन्वर्तमाने व्यवहारिके चांद्रमानेन प्रभवादिषष्टिसंवत्सराणां मध्ये अस्मिन्संवत्सरे.... अस्मिन्नयनेऽस्मिन् ऋतौ.... अस्मिन्मास.... अस्मिन्पक्षे.... शुभवासर.... शुभनक्षत्र.... शुभयोग.... शुभकरण.... युक्तायां एवंगुणविशेषणविशिष्टायामस्यां शुभतीथौ उपात्तदुरितक्षयद्वारा श्रीसांबसदाशि-

वप्रीत्यर्थं.... अमुकगोत्रोभ्दवयोरावयोः सत्सन्तानसौभाग्यफलसिध्द्यर्थ रात्रौ गर्भाधानाख्यं कर्म करिष्यमाणः गर्भाधानांगभूतनांदीशोभनदेवताप्रीत्यर्थं नांदीसमाराधनाख्यं कर्म करिष्यमाणः गर्भाधानलग्नकाले फलदानानि कर्तुं फलपूजाख्यं कर्म करिष्यमाणः तदंगत्वेन तदादौ शुध्द्यर्थं वृध्द्यर्थं अभ्युदयार्थं च माहेश्वरैः सह स्वस्तिपुण्याहवाचनं करिष्ये इति संकल्प्य उत्तरोत्तराभिवृध्द्यर्थं श्रीमहागणाधिपतिपूजां करिष्य।

आचम्य प्राणानायम्य।। तद्यथा।। अप उपस्पृश्येंद्रियाण्यभ्दिः संस्पृश्य तर्जनीमध्यमांगुलिद्वयं विसृज्यांगुष्ठानामिकाकनिष्ठिकांगुलित्रयेण प्राणायामं कुर्यात्।। सव्याहृतीः सप्रणवा गायत्रीं शिरसा सह् ।। त्रिःपठेदायतप्राणः प्राणायामः स उच्यते ।।६।। सव्येन चंद्रसंज्ञेन पुरयेत्।। द्वादशांते कुंभकं कुर्यात्।। ततः सूर्यस्वरेण दक्षिणेन रेचयेत्।। प्राणायामक्रमः।।

मनाकरितां देवतांना बोलवण्याचें चिन्ह जी घांट ती वाजवावी. (४) नादमय शब्दमय असलेली, सर्व विघ्न दूर करणारी, देवतांना बोलावणारी जी घांट, तिची पूजा अस्त्रमंत्रानें करावी. (५) हे शंकरा, घांटेच्या मूलभागीं, गळ्याच्या वरच्या बाजूला, शूलाच्या अग्रभागीं सर्व वसुगण राहो. (अशी प्रार्थना करावी) मग घंटानाद करून विचार आचमन करून प्राणायाम करावा. आचमनाचा प्रकार पुढीलप्रमाणें "ऋग्वेदाय स्वाहा" पासून "अस्त्राय नमः" पर्यंत नामोच्चार करावा. असा आचमनविधि संपला. नंतर उदकस्पर्श करून पाण्यानें सर्व इंद्रियांचा स्पर्श करून तर्जनी मध्यमा ही दोन बोटें सोडून (६) अंगुष्ठ, अनामिका, कनिष्ठिका या तीन बोटांनी प्राणायाम करावा. व्याहृति, प्रणव, गायत्रीशीर्ष यांसह प्राणनियमन करून तीन वार पठन करणें याला प्राणायाम ह्मणतात. चंद्रसंज्ञक डाव्या नाकपुडीनें वायु पूर्ण करावा. द्वादश दलाच्या शेवटी कुंभक करावा, नंतर सूर्य नांवाच्या उजव्या नाकपुडीनें रेचन करावें. (वायु सोडावा) "ॐभूः" पासून "भूर्भवः सुवरों" पर्यंत पूरक कुंभक रेचक क्रमानें त्रिवार पठन करणें याला एक प्राणायाम ह्मणतात. असा प्राणायाम करून देशकालाचें स्मरण करावें.(शुभदिवशीं शुभमुहूर्ती) "अद्य ब्रह्मणः" पासून "शुभतिथौ"

**इत्येवं पूरककुंभरैचकैस्त्रिवारं पठणे एकः प्राणायामः।। तदादौ निर्विघ्नेन परिसमाप्तिद्वारा**

पर्यंत मंत्र ह्मणून पापक्षय करून घेऊन, श्रीसांबसदाशिवाच्या प्रीतीकरितां, अमुक गोत्रामध्यें उत्पन्न झालेल्या आह्मा दोघांना सत्संतान व सौभाग्य यांच्या फलसिद्धीकरितां रात्रीच्या वेळेस गर्भाधान नांवाचें कर्म करणार आहें, व त्या गर्भाधानाचें अंगभूत नांदीशोभनदेवताप्रीतीकरितां नांदीसमाराधान कर्म करणार आहे, व गर्भाधानाच्या लग्नाच्या वेळीं फलदान करावयाकरितां फलपूजा नांवाचें कर्म करणार आहें, तर या कर्माचें अंगभूत स्वस्तिपुण्याहवाचन कर्मशुद्धीकरितां, वृद्धीकरितां, अभ्युदयाकरितां माहेश्वरांसह करितों, असा संकल्प करावा, व त्याच्या आधीं निर्विघ्नानें कर्म समाप्त होण्याकरितां, व उत्तरोत्तर अभिवृद्धीकरितां श्रीमहागणपतीची पूजा करितों, असा संकल्प करून ज्या ज्या कर्मामध्यें जो जो अंगभूत संकल्प असेल तो तो संकल्प करावा. नंतर "गणानां त्वा" या मंत्रानें व "ॐ भूः गणपतिमहावाह्यामि" या मंत्रानें गणपतीचें आवाहन करावें, पुनः "ॐ भुवः" या मंत्रानें "ॐ सुवः" या मंत्रानें "ॐ

**उत्तरोत्तराभिवृध्द्यर्थं श्रीमहागणाधिपतिपूजां करिष्ये।।८।। इति संकल्प्य यत्र यत्र यद्यत्कर्म तत्र तत्र तत्तदंगभूतसंकल्पं कुर्यात् ।।**

**गणानां त्वा गुणपतिहवामहे कविं कवीनामुपमः श्रवस्तमं । जेष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आनः श्रृण्वन्नूतिभिः सीदसाधनं । ॐ भूः गणपतिमावाह्यामि ॐ भुवः गणपतिमावाहयामि ॐ सुवः गणपतिमावाहयामि ॐ भूर्भवः सुवः गणपतिवाहयामि**

**।। ९।। इत्यावाह्य नवशक्तिपूजां करिष्ये।।**

**तीव्रायै नमः ज्वालिन्यै नमः नंदायै नमः भोगदायिन्वै नमः कामरूपिण्यै नमः उग्रावै नमः तेजोवत्यै नमः सत्यायै नमः विघ्ननाशिन्यै नमः ॐ नमो भगवते**

**सकलगुणात्मकशक्तियुताय महागणाधीश्वराय योगपद्मपीठात्सने नमः।। सुवर्णपीठं कल्पयामि।। ॠॐ**

---

स्वात्मसंस्थमजं शुद्धं त्वामद्य गणनायक।। अरणाविव हव्याशमूर्तिवाहयाम्यहं।। ॐ भूर्भव: सुवरोम्
सशक्तिसांगसायुधवाहनसपरिवार महागणाधीश्वर अत्रागच्छागच्छ आवाहयामि आवाहितो भव स्थापयामि स्थापितो भव सन्निहितो भव अवकुंठितो भव व्याप्तो भव वरदो भव ।।१०।। इति षण्मुद्राः प्रदर्श्य ।।

एकदन्ताय विद्महे वक्रतुंडाय धीमहि ।। तन्नो विघ्नेश्वरः प्रचोदयात गां हृदयाय नमः गीं शिरसे स्वाहा गूं शिखायै वषट् गैं कवचाय हुं गौं नेत्रत्रयाय वौषट् गः अस्त्राय फट् ॐ भूर्भुवः सुबरोमिति दिग्बंधः ।
(ध्यानं)।।रक्तो रक्तांगरागः शुककुसयुतस्तुंदिलश्चंद्रमौलिर्नैनैयुक्तस्त्रिभिर्वामनकरचरणो भूर्भुवःस्वः" या मंत्रानें गणपतीचें आवाहन करावें. (असें आवाहन करून) नंतर नवशक्तींची पूजा करितों, असा संकल्प करून "तीव्रायै नमः" पासून "ॐ नमो भगवते" पर्यंत मंत्र ह्मणून सुवर्णपीठाची कल्पना करावी. नंतर "स्वात्मसंस्थ" पासून "ॐ भूर्भस्वः सुवरों" पर्यंत मंत्र ह्मणून शक्ति, अंग, आयुध, वाहन परिवार यांसहित हे गणाधीश्वरा येथें ये ये येथें तुझें आवाहन करितों आवाहित हो, स्थापना करितों, स्थापित हो, सन्निहित हो, अवकुंठित हो, व्याप्त हो, वरद हो असें ह्मणून सहा मुद्रा दाखवाव्या. नंतर "एकदंताय" पासून "प्रचोदयात्" पर्यंत मंत्र ह्मणून नंतर "गां हृदयाय नमः" पासून "ॐभूर्भुवः सुवरों" पर्यंत मंत्र ह्मणून न्यास दिग्बंधन वगैरे कर्म करावें. नंतर "रक्तो" पासून "गां"
बीजपूरात्तवासाः।। हस्ताग्रत्क्लप्तपाशांकुशगदवरदो नागवस्त्रोहिभूषो देवः पद्मासनस्थो भवतु नतसुरो भूतये विघ्नराजः।। गं गणपतये नमः

इति जपं कृत्या।।

सुमुखश्चैकदन्तश्च कपिलो गजकर्णकः।। लंबोदरश्च विकटो विघ्नराजो गणाधिपः। धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचन्द्रो गजाननः।। वक्रतुण्ड शूर्पकर्णो हेरंबः स्कन्दपूर्वजः।। षोडशैतानि नामानि यः पठेच्छृणुयादपि।। विद्यारंभे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा ।। संग्रामे सर्वकार्येषु विघ्नस्तस्य न जायते।। अभीप्सितार्थसिध्द्यर्थ पूजितो यः सुरैरपि।। सर्वविघ्नच्छिदे तस्मै गणाधिपतये नमः।।

आवाहनासनं पाद्यमर्षमाचमनीयकं।। स्नानं वस्त्रोपवीतं च गंधाभरणपुष्पकं।। धूपं दीपं च नैवेद्यं तांबूलं च प्रदक्षिणं।। नमस्कारं ततः कुर्यादुपचारास्तुषोडश।।

श्रीमहागणाधिपतये नमः।। ध्यानावाहनादिषोडशोपचारपूजामाचरिष्ये ध्यायामि ध्यानं समर्पयामि।। आवाहयामि आसनं समर्पयामि। पादयोः पाद्यं पाद्यं समर्पयामि। हस्तयोरर्घ्यमर्घ्यं समर्पयामि।। मुखांबुजे आचमनीयं समर्पयामि।

(स्नान मंत्र) आपोहिष्ठा मयो भुवस्तान ऊर्जे दधातन महेरणाय चक्षसे।। यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयते हनः उशतीरिव मातरःतस्मा अरंगगामवो यस्य क्षयाय जिन्वथ आपो जनयथा च नः।

श्रीमहागणाधिपतये नमः शुद्धोदकस्नानं समर्पयामि। स्नानान्तरमाचमनीयं समर्पयामि।।

(भस्म मंत्र) त्रियंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनं।। उर्वारुकमिव बंधनान्मृत्योर्मु-क्षीय मामृतात्। श्रीमहागणधिपतये नमः।।१२।। भस्म परिकल्पयामि।।

(वस्त्र मंत्र)युवं वस्त्राणि पीवसावसाथे युवोरच्छिद्रामन्तबो

गणपतये नमः" पर्यंत मंत्राचा जप करून "सुमुखश्चैकदंतश्र्च" पासून "गणाधिपतये नमः" पर्यंत मंत्र ह्मणून आवाहन, आसन, पाद्य, अर्ध्य, आचमन, स्नान, वस्त्र, उपवीत गन्ध, आभरण, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, तांबूल, प्रदक्षिणा, नमस्कार वगैरे षोडशोपचार जे आहेत, लक्षांत आणून "श्रीमहागणाधिपतये नमः" या मंत्रानें व "ध्यानावाहनादिषोडशोपचारपूजांकरिष्ये" असा संकल्प करून आचमनापर्यंत गणपतीस षोडशोपचारपूजासमर्पण करावें. नंतर "ॐआपोहिष्ठा" पासून "यथाचनः" पर्यंत मंत्र ह्मणून गणाधिपतीला शुद्धोदक स्नान घालावें. स्नानानंतर पुनः आचमन द्यावें. "त्रियंबकं" मंत्र ह्मणून गणपतीस भस्म द्यावें. "युवंवस्त्राणि" मंत्र ह्मणून गणपतीस वस्त्र द्यावें.उपवीता-

हसर्गाः अवातिरंतिरमृतानि विश्ववऋतेन मित्रावरुणासचे थे। श्रीमहागणाधि पतये नमः वस्त्रयुग्मं समर्पयामि।

उपवीतार्थं पुष्पं समर्पयामि।।

(गंध मंत्र)गन्धद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीं।। ईश्वरी सर्वभूतानां तामिहोपव्हये श्रियं।। श्रीमहागणाधिपतये नमः दिव्यगन्धं धारयामि।।

अर्चत प्रार्च्यत प्रियमेधासो अर्च्यत अर्च्यन्त पुत्रकाः उत पुरं न धुष्मर्चत अर्च्यत प्रार्च्यत श्रीमहागणाधिपतये नमः अक्षतान्समर्पयामि।।

(पुष्प मंत्र)सुमुखाय नमः एकदन्ताय नमः कपिलाय नमः गजकर्णाय नमः लंबोदराय नमः विकटाय नमः विघ्नराजाय नमः गणाधिपाय नमः धूम्रकेतवे नमः गणाध्यक्षाय नमः भालचन्द्राय नमः गजाननाय नमः वक्रतुण्डाय नमः शूर्पकर्णाय नमः हेरंबाय नमः स्कंदपूर्वजाय नमः सर्वसिद्धिप्रदायकाय नमः।।१६।। श्रीमहागणाधिपतये नमः नानाविधपरिमलपत्रपुष्पाणि समर्पयामि।।

(धुप मंत्र)धूरसि धूर्व धूर्वतं धूर्वतयोस्मान् धूर्वति तं धूर्वयं वयं धूर्वामः।।१७।। श्रीमहागणाधिपतये नमः धूपमाघ्रापयामि।।

(कर्पुर मंत्र)सोमो वा एतस्य राज्यमाधत्ते यो राजा सन् राज्यो वा सोमेन यजते देवसुवामेतानि हवींषि भवंति एतावन्तो वै देवाना सवाः तएवास्मै सवान्प्रयच्छन्ति त एनं पुनः सुवन्ते राज्याय देवसुराजा भवति श्रीमहागणाधिपतये नमः कर्पूरदीपं दर्शयामि।।

धूपदीपानंतरमाचमनीयं समर्पयामि।।

(प्रौक्षन मंत्र)ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि।। धियो यो नः प्रचोदयात् ।। इति गायत्र्या प्रोक्ष्य सत्यंत्वर्तेन परिषिंचामि इति परिषिच्य

अमृतोपस्तर्णमसीति पूर्वापोशनं दत्वा

करितां पुष्पसमर्पण करावें. "गन्धद्वारां" या मंत्रानें गणपतीस गन्धसमर्पण करावें. "अर्चत" मंत्रानें गणपतीस अक्षता द्याव्या (वहाव्या) "सुमुखाय" पासून "श्रीमहागणाधिपतये नमः" पर्यंत नाममंत्र ह्मणून अनेक त-हेचीं सुवासिक फुलें समर्पण करावींत. "धूरसि" मंत्रानें गणपतीस धूपसमर्पण करावें. "सोमो वा" या मंत्रानें गणपतीस कापराची आरती करावी. धूपदीपानंतर आचमन समर्पण करावें.

"ॐ तत्सवितु" या मंत्रानें प्रोक्षण करून "सत्यंत्वर्तेन" मंत्रानें परिषेचन करून "अमृतोपस्तरणमसि" या मंत्रानें पूर्वापोशन द्यावें. "प्राणाय" पासून "ब्रह्मणे" पर्यंत मंत्र ह्मणून गणपतीस

**(गुळाचा नैवैद्य मंत्र) प्राणाय स्वाहा अपानाय स्वाहा व्यानाय स्वाहा उदानाय स्वाहा समानाय स्वाहा ब्रह्मणे स्वाहा श्रीमहागणाधिपतये नमः यथाभागशः गुडनैवेद्यं समर्पयामि।**

**मध्ये मध्ये स्वादूदकं समर्पयामि।।**

**(तांबूल मंत्र) पूगीफलसमायुक्तं नागवल्लीदलैर्युतं।। कर्पूर चूर्णसंयुक्तं तांबूलं प्रतिगृह्यतां।। महागणाधिपतये नमः तांबूलं समर्पयामि।**

**तांबूलचर्वणानंतरमाचमनीयं समर्पयामि।।**

**(दक्षिणा मंत्र) हिरण्यगर्भगर्भस्थं हेमबीजं विभावसोः।। अनंतपुण्यफलदमतः शान्तिं प्रयच्छ मे।। इति पूजासादुण्यार्थं यथाशक्ति दक्षिणां समर्पयामि।।**

**तत उत्तरनीराजनं दर्शयामि। नीराजनानंतरमाचमनीयं समर्पयामि।।**

**(पुष्पांजली मंत्र) निषुसीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कवीनां। न ऋते त्वत्क्रियते किंचनारे महामर्कं मघवं चित्रमर्च। श्रीमहगणाधिपतये नमः पुष्पांजलिं समर्पयामि।।**

**(प्रदक्षणा मंत्र) प्रकृष्टपापनाशाय प्रकृष्ट-फलसिद्धये।। प्रदक्षिणं करोमीश प्रसीद परमेश्वर।। सर्वार्थसाधनोपाय सर्वैश्चर्यप्रदायक।। समस्तापत्प्रतीकार चन्द्रशेखर ते नमः।। इति शिरसा प्रदक्षिणनमस्कारान्समर्पयामि।।**

**(क्षमापन) यस्य स्मृत्या च नामेत्क्या तपःपूजा क्रियादिषु।। न्यूनं संपूर्णतां याति सद्यो वन्दे सदाशिवं।। मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं गणाधिप।। यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु ते।।**

**(विसर्जन मंत्र) अनेन श्रीमहागणाधिपतिपूजाविधानेन भगवान् सर्वात्मकः श्रीसांबसदाशिवः सुप्रीतः सुप्रसन्नो वरदो भवतु।। इति साक्षतहिरण्योदकं**

**विसृजेत्।। यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन्। तेहनाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवा :। श्रीमहागणाधिपतिं यथास्थानं प्रति-**

गुळाचा नैवेद्य दाखवावा. मध्यें मध्यें गोड पाणी द्यावें. "पूगीफलं" या मंत्रानें गणपतीस तांबूल समर्पण करावें. तांबूलचर्वणानंतर आचमन द्यावें. "हिरण्य" या मंत्रानें पूजासादुण्याकरितां शत्क्यनुसार दक्षिणा द्यावी. नंतर उत्तरनीराजन करावें. नंतर आचमन द्यावें. नंतर "निषुसीद" या मंत्रानें मंत्रपुष्प द्यावें. "प्रकृष्टपाप" या पासून "ते नमः" पर्यंत मंत्र ह्मणून प्रदक्षिणा नमस्कार घालावें. "यस्यस्मृत्या" पासून "परिपूर्ण तदस्तुमे" पर्यंत मंत्र ह्मणून या गणपतीच्या पूजेनें भगवान्, सर्वांतर्यामी, सांबसदाशिव हा संतुष्ट होवो, प्रसन्न होवो, वरद होवो असें ह्मणून सुवर्णमिश्र उदक सोडावे. "यज्ञेन यज्ञ" **ष्ठापयामि शोभनार्थ पुनरागमनाय च।।**

**(दक्षिण उत्तर जमिनीस स्पर्श करून जप करावा)श्रीः श्रीः रंगवल्यादियुक्ते भूतले महीद्योः पृथिवी च न इमं यज्ञं मिमिक्षतां। पिपृतां नो भरीमभिः। इति दक्षिणोत्तरतो भूमिं स्पृष्टा जपेत् ।।**

**(तांदुळ रासी स्थापना) ओषधयः संवदन्ते सोमेन सह राज्ञा। यस्मै करोति ब्राह्मणस्त राजन् पारयामसि।। इति प्रस्थपरिमितौ तण्डुलपुंजौ दक्षिणोत्तरतः कृत्वा**

**(कलश स्थापना) आकलशेषु धावति श्येनो वर्मविदाहते। अभिद्रोणा कनिक्रदत् पवित्रेषु परिषिच्यते उक्तैर्यज्ञेषु वर्धते। इति पुंजोपरि सुधालेपितसौवर्णाद्यन्यतमकलशौ निधाय।**

**(तिर्थजल कलशात सोडणे) इमं में गंगे यमुने सरस्वति शतद्रुस्तोम स च तापरुष्णिया। असिक्रियामरुद्वृधे वितस्तयार्जी किये श्रुणु ह्यासुषोमया।। इति तीर्थजलेन प्रत्येकं पूरयित्वा।।**

**(कलशात गंध वहाणे) गंधद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीं। ईश्वरी सर्वभूतानां तामिहोपव्हये श्रियं। इति कलशयोर्गन्धं दद्यात्।**

(कलशास मालार्पण) चंदनादिनातावनुलिप्य मालाभूषितौ कृत्वा।

(कलशात आम्रपल्लवे) एष रुद्रो यदग्निरोषधीः प्राश्याग्नावादित्यं जुहोति रुद्रादेव पशूनन्तर्दधात्यथो औषधीष्वेव पशून्प्रतिष्ठापयति। इत्याम्रपल्लवैरलंकृत्य

(कलशात श्रीफळ स्थापना) पूर्णादर्विपरापत सुपूर्णा पुनरापत। वस्त्रेव विक्क्रिणावहा इषमूर्ज शतक्रतो।। याः फलिनीर्याऽअफलाऽअपुष्या याश्चपुष्पिणीः।। बृहस्पतिप्रसूतास्तानो मुंचंत्व हसः।। इति कलशयोरुपरि नारिकेलफले निक्षिप्य।।

(कलशात दुर्वा) काण्डात् काण्डात् प्ररोहन्ति परुषः परुषः
या मंत्राने गणपतीची प्रतिष्ठा स्थानाला अनुसरून करावी. "शोभनार्थं पुनरागमनायच" या मंत्राने विसर्जन करावें. नंतर जमीन सारवून रांगोळी घालून "महा द्यो:" या मंत्राने दक्षिणेकडची उत्तरेकडची जमीन स्पर्श करून जप करावे. मग "औषधयः" या मंत्राने प्रस्थ (१ शेर) परिमाणाचे तांदूळ घेऊन दोहोकडे (दक्षिणोत्तरेस) तांदुळाची रास घालावी. नंतर "आकलशेषु" या मंत्रानें तांदुळांच्या राशीवर चुना सारविलेले सोने वगैरे कशाचे तरी दोन कलश ठेवावेत. "इमंमे" या मंत्रानें प्रत्येक कलशांत तीर्थोदक भरावें "गंधद्वारा" या मंत्रानें दोनी कलशांत गंध टाकून चन्दनादिकानें लेपन करून दोनी कलशांच्या गळयांत फुलांची माळ घालावी. "एष रुद्रो" या मंत्रानें अंब्याच्या पानांनी अलंकृत करावे. "पूर्णा दर्वि" पासून "मुंचं त्व हसः" पर्यंत मंत्र ह्मणून कलशांवर नारळ ठेवावे "कांडात्कांडा" या मंत्रानें दर्भकूर्च

परि।। ये वानो दूर्वे प्रतनु सहस्त्रेण शतेनच।। इति दर्भकूर्चं निदध्यात्।।

(कलशात पंचरत्न) स हि रत्नानि दाशुषे सुबाति सविताभगः। तं भागं चित्रमीमहे।। इति पंचरत्नानि निक्षिप्य।।

(कलशात सुवर्ण) हिरण्यरूपः स हिरण्य संदृगपान्नपात्स्ये तु हिरण्यवर्णः।। हिरण्ययात्परियोनेर्निषद्या हिरण्यदादत्यं नमस्मै।। इति निष्कं निष्कार्धं वा हिरण्यं दद्यात्।।

**(कलशास वस्त्र) युवा सुवासाः परिवीत आगात्स उश्रेयान्भवति जायमानः। तं धीरासः कवय उन्नयन्ति स्वाधियो मनसा देवयंतः।। इति कलशयोरुपरि वस्त्रयुग्मं निदध्यात्।।**

**(कलशास वस्त्रमाला) तन्तुं तन्वन्नजसो भानुमत्विः ज्योतिष्मतः पथो रक्षधिया कृतान् अनुल्बणं पयसजो गूवमपो मनुर्भव जनयादैव्यं जनं।। इति श्र्वेततन्तुभिर्वेष्टयेत्।।**

**(वरूण देवतेचे आवाहन करावे) तत्वायामि शुनःशेफो वरुणस्त्रिष्टुप्। उत्तरकलशे वरुणा वाहने विनियोगः।। तत्वायामि ब्रह्मणा वंदमानस्तदाशास्ते यजमानो हविर्भिः। अहेडमानो वरुणेह बोध्युरुश समान आयुः प्रमोषीः। ॐभूः वरुणमावाहयामि ॐभुवः वरुणमावाहयामि ॐसुवः वरुणमाहयामि ॐभूर्भुवःसुवः वरुणमावाहयामि इत्यावाह्य।।**

**(कलशस्पर्श) कलशस्य मुखे रुद्रः कण्ठे विष्णुः समाश्रितः।। मूले तत्र स्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणाः स्मृताः।। कुक्षौ तु सागराः सर्वे सप्तद्वीपा वसुंधरा।। ऋग्वेदोऽथ यजुर्वेदः सामवेदो ह्यथर्वणः।। अंगैश्च सहिताः सर्वे कलशं तु समाश्रिताः।। गंगेऽच यमुनेचैव गोदावरि सरस्वति।। नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन्सन्निधिं कुरु।।**

**इति कलशौ स्पृष्ट्वा जपेत्।। पूजां कुर्यात् ।। वरुणाय नमः ध्यानावाहनादिषोड शोपचारपूजां समर्पयामि अनया पूजया वरुणदेवः सुप्रीतः सुप्रसन्नो**

कलशांत टाकावें. "सहि रत्नानि." या मंत्रानें पांच रत्नें टाकावीत. "हिरण्यरूपः" या मंत्रानें निष्क (९० तोळे) किंवा त्या निम्म्यानें सोनें टाकावें. "युवा सुवासाः" या मंत्रानें दोन वस्त्रें कलशांत गुंडाळावींत. "तंतु" या मंत्रानें कापसाचें पांढरे तंतु कलशांभोवती गुंडाळावे. "तत्वायामि" या मंत्रानें व "ॐभूः" पासून "ॐभूर्भुवः सुवः" पर्यंत मंत्र ह्मणून वरुणांचे आवाहन करावें. असें वरुणाचें आहवान करून "कलशस्य" पासून "सन्निधिं कुरु" पर्यंत मंत्र ह्मणून कलशस्पर्श करावा. "वरुणाय नमः" असे ह्मणून ध्यानावाहनादि षोडशोपचारपूजा करावी. या पूजेनें वरुण देव प्रीत असो, प्रसन्न असो, वरद

वरदो भवतु।। इति साक्षतहिरण्योदकं विसृजेत्।। पवित्रपाणिः प्राणानायम्य देशकालौ संकीर्त्य

(संकल्प) एवंगुणेत्यादिशुभतिथौ गर्भाधानकर्म कर्तुमादौ गृहभाण्डभाजनआत्मद्रव्यस्थलशुद्ध्यर्थ धनकनकवस्तुवाहनायुरारोग्यादिमहदैश्वर्याभिवृद्ध्यर्थं पुत्रपौत्रकलत्रमित्राद्यभ्युदयार्थं च माहेश्वरैः सह स्वस्तिपुण्याहवाचनं करिष्ये इति संकल्प्य।।

(इष्टदेवता स्मरण) सर्वेषु कालेषु समस्तदेशेष्वशेषकार्येषु तथैश्वरीश्वरः।। सर्वैः स्वरूपैर्भगवाननादिर्ममास्तु मांगल्यविवृद्धये शिवः।। गायत्री चैव सावित्री शान्तिः पुष्टिकरी तथा।। आयान्तु मम शान्त्यर्थं दुरितक्षयकारकाः।। अनन्याश्चिन्तय तो मां ये जनाः पर्युपासते।। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्।। स्मृतेः सकलकल्याणभाजनं यत्र जायते।। पुरुषस्तमजं नित्यं व्रजामि शरणं शिवं।। सर्वमंगलमांगल्ये शिवे सर्वार्थसाधके।। शरण्ये त्र्यंबके देवि नारायणि नमोऽस्तु ते। तदेव लग्नं सुदिनं तदेव ताराबलं चंद्रबलं तदेव।। विद्याबलं दैवबलं तदेव गौरीपतें तेंऽघ्रियुगं स्मरामि।। इतीष्टदेवतां ध्यात्वा।।

(गुडगे टेकून कमळ कळी सारखे हात जोडून देवतांना नमस्कार करावा)

अवनिकृतजानुमण्डलः कमलमुकुलसदृशमंजलिं शिरसि कृत्वा।। ॐ उमामहेश्वराभ्यां नमः प्रमथगणेभ्यो नमः भक्तमाहेश्वरेभ्यो नमः दुर्गागणपतिक्षेत्रपालकेभ्यो नमः मातृभ्यो नमः पितृभ्या नमः।। आचार्येभ्यो नमः सर्वेभ्यो माहेश्वरेभ्यो नमः। इति शिष्टनमस्कारं कृत्वा। तत्पुरतः प्रशस्तान्प्रतिवचनसमर्थान्निषिद्धप्रतिग्रहनिवृ-

असो अशी प्रार्थना करून अक्षतांसह सुवर्णोदक सोडावें. मग पवित्र हातांत ठेवून प्राणायाम करून देशकालांचा उच्चार करून "एवंगुण" पासून "स्वस्ति पुण्याहवाचनं करिष्ये" पर्यंत संकल्पाचें वाक्य ह्मणून संकल्प करावा. असा संकल्प करून नंतर "सर्वेषु" या श्लोकापासून "तेंऽघ्रियुगं स्मरामि" या श्लोकापर्यंत ह्मणून इष्टदेवतेचें स्मरण करावें. असें स्मरण करून जमिनीवर गुडघे टेंकून बसून कमलकळीसारखे हात जोडून "ॐ उमामहेश्वराभ्यां नमः" असें

ह्मणून नमस्कार करावा, भक्तमाहेश्वरांना नमस्कार करावा. दुर्गा, गणपति, क्षेत्रपाल यांना नमस्कार करावा, मातृगणांना नमस्कार करावा, पितरांना नमस्कार करावा; आचार्यांना नमस्कार करावा; सर्व माहेश्वरांना नमस्कार करावा. याप्रमाणे शिष्टांना नमस्कार करून नंतर पुढें प्रशस्त, प्रतिवचन देण्यास

**त्तांश्छुचीन्सोतरीयान् पवित्रपाणीन् युग्मान्माहेश्वरानुपविश्य।। ततः कर्ता दक्षिणेन पाणिना उत्तरकलशं बिभ्रन् (यज.) आप इत्युक्त्वा (माहे.) शिवा आपः सन्त्विति माहेश्वरान्याचयित्व।। (यज.) सुगंधाः पान्त्वित्युक्त्वा।। (माहे.) सौमंगल्यं चास्त्विति वाचयित्व।। (यज.) अक्षताः पांत्वित्युक्त्वा।। (माहे.) आयुष्यमस्त्विति वाचयित्वा।। आयनेते परायणीः दूर्वारोहंतु पुष्पिणीः। -हदाश्च पुण्डरीकाणि समुद्रस्य ग्रहा इमे।। (यज.) पुष्पाणि पांत्वित्युक्त्वा (माहे.) स्वश्रेयसमस्त्विति वाचयित्वा।। (यज.) तांबूलानि पांत्वित्युक्त्वा। (माहे.) ऐश्वर्यमस्त्विति वाचयित्वा।। (यज.) दक्षिणाः पांत्वित्युक्त्वा।। (माहे.) बहुधेयं चास्तु अक्षतं चारिष्टं चास्तु दीर्घमायुः शान्तिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु श्रीर्विद्या विनयो बहुवित्तं चास्तु इति वाचयित्वा।। यं कृत्वा सर्ववेदयज्ञक्रियाकरणकर्मारंभाः शुभाः शोभनाः प्रवर्तन्ते ।। तमहमोंकारमादिं कृत्वा भवब्दिरनुज्ञातः पुण्यं पुण्याहं वाचयिष्ये।। वाच्यतामिति वदेयुः।**

(माहे आशिर्वाद.) **भद्रं कर्णेभिः श्रृणुयाम देवा भद्रं पश्ये-माक्षभिर्यजत्राः।।स्थिरैरंगैस्तुष्टुवा सस्तनूभिर्व्यशेमदेवहितं यदायुः।। द्रविणोदा द्रविणसस्तुरम्य द्रविणोदाःसनरस्य प्रयंसत् । द्रविणोदा वीरवती विषण्णो द्रविणो दारासते दीर्घमायुः ।। सवितापश्चादात्सविता पुरस्तात्सवितोत्तरात्ता-**

समर्थ असलेले, निषिद्ध दान न घेणारे, शुचिर्भूत असलेले, उत्तरीय (पांघरा-वयाचें) वस्त्र पांघरलेले पवित्र हातांत ठेवलेले, दोन माहेश्वरांना बसवून नंतर कर्त्यानें उजव्या हातानें डावीकडचा कलश घेऊन "आपः" असें आपण ह्मणून "शिवाआपः संतु" असें माहेश्वरांकडून प्रतिवचन घ्यावें. " सुगंधाः पांतु " असें आपण ह्मणून "सौमंगल्यं चास्तु" असें प्रतिवचन घ्यावें. "अक्षताः पांतु" असें आपण ह्मणून "आयुष्यमस्तु" असें प्रतिवचन घ्यावें. "आयनेते" मंत्र

ह्मणून "पुष्पाणि पांतु" असें आपण ह्मणून "स्वश्रेयसमस्तु" असें प्रतिवचन घ्यावें. "तांबूलानि पांतु " असें ह्मणून " ऐश्वर्यमस्तु " असें प्रतिवचन घ्यावें. "दक्षिणाः पांतु" असें ह्मणून " बहुधेयंचास्तु " असें प्रतिवचन घ्यावें. "अक्षतं" पासून "बहुवित्तंचास्तु" पर्यंत प्रतिवचन घ्यावें. जें केलें असता सर्व वेद, यज्ञ, क्रिया, करण, कर्मारंभ वगैरे शुभ होऊन मंगलकर असे प्रवृत्त होतात, त्या ॐ कराला प्रथम नमन करून तुमची आज्ञा घेऊन पुण्यकर पुण्याहवाचन करतों, असें कर्त्याने ह्मटल्यानंतर पुण्याहवाचन करा असें प्रतिवचन माहेश्वरांकडून घ्यावें. नंतर "भद्र कर्णे"पासून "प्रजामायुर्धनं च" पर्यंत मंत्ररहित "दीर्घ आयुष्य **त्सविताधरात्तात्सविता नस्सन्तु सर्व रातिं सवितानोराप्तसां दीर्घमायुः ।।नवो-नवो भवति जायमानोन्हांकेतुरुषसामेत्यग्रे।। भागं देवेभ्यो विदधात्यायन् प्रचंद्रमा स्थिरति दीर्घमायुः ।। आप उंदन्तु जीवसे दीर्घायुत्वाय वर्चसे ।। यस्त्वाहृदाकीरिणा मन्यमानो मर्त्यं मर्त्यो जोहवीमि ।। जातवेदो यशो अस्मासुधेहि प्रजाभिरग्नेरमृतत्वमस्यां ।। यस्मै त्व सुकृते जातवेद उलूकमग्ने कृणवस्योनं।। अश्विन सपुत्रिणं वीरवन्तं गोमन्त रयिन्नशते स्वस्ति।। संत्वा सिंचामि यजुषा। प्रजामायुर्धनं च।**

**दीर्घमायुरस्त्विति वाचयित्वा।। स्वामिनःमनः समाधीयतामित्युक्त्वा।। समाहितमनसः स्म इति वाचयित्वा ।। प्रसीदंतु भवन्त इत्युक्त्वा ।। प्रसन्नाः स्म इति वाचयित्वा ।।**

(उजव्या कलशातील जल डाव्या कलशात सोडणे) **सर्वैः सह शान्तिरस्तु पुष्टिरस्तु तुष्टिरस्तु वृद्धिरस्तु अविघ्नमस्तु आयुष्यमस्तु आरोग्यमस्तु स्वस्त्यस्तुशिवं कर्मास्तु कर्मसमृद्धिरस्तु शास्त्रसमृद्धिरस्तु वेदसमृद्धिरस्तु पुत्रसमृद्धिरस्तु धनधान्यसमृद्धिरस्तु इष्टसंपदस्तु इत्येतैः पंचदशवाक्यैर्दक्षि-णकलशोदकं उत्तरकलशे किंचित्किंचिन्निनीय ।।**

(डाव्या कलशातील जल ईशान्य दिशेला शिंपणे) **ईशान्यां बहिर्देशे अरिष्टनि-रसनमस्त्वित्युत्तरकलशोदकं ईशान्यदेशे**

(अग्नेय दिशेला जल शिंपणे) **क्वचिद्विसृज्य यत्पापं।। तत्प्रतिहम-**

**स्त्वित्याग्नेय्यां पूर्ववत्।। यच्छ्रेयस्तदस्तु उत्तरे कर्मण्यविघ्नमस्तु उत्तरोत्तरमह-रहरभिवृद्धिरस्तु ।।**

(डाव्या कलशातील जल वेगळ्या पात्रात घेऊन नैऋत्यकडे शिंपडावे) **उत्तरोत्तरा : क्रिया : शुभा : शोभना : प्रवर्तन्तां।। शुक्रांगारकबुधबृहस्पतिशनिराहुकेतुसेमसहितादित्यपुरोगास्सर्वे ग्रहाः प्रीयं-तां।। तिथिकरणमुहूर्तजन्मनक्षत्रदिग्देवताः प्रियन्तां।। माहेश्वरीपुरोगा मातरः**

असो" असें प्रतिवचन घ्यावें. स्वामींनीं मग एकाग्र मन करावें, असें आपण प्रार्थना करून समाहित मनाचे आह्मी आहोंत, असें प्रतिवचन घ्यावें. आपण प्रसन्न व्हा, असें ह्मणून प्रसन्न आहों असें प्रतिवचन घ्यावें. नंतर " सर्वैः सह शांतिरस्तु " पासून "इष्टसंपदस्तु" पर्यंत पंधरा वाक्यांनी उजव्या कलशांतलें पाणी किंचित् डाव्या कलशांत टाकून "ईशान्यां" हे वाक्य ह्मणून डाव्या कलशांतलें पाणी ईशान्य दिशेकडे टाकावें. "यत्पापं" असें वाक्य ह्मणून पूर्वीप्रमाणे आग्नेय दिशेकडे पाणी सोडावें. जें श्रेयस्कर असेल तें असो, पुढचें कर्म निर्विघ्नपणें होवो, उत्तरोत्तर प्रतिदिवशीं अभिवृद्धि होवो, उत्तरोत्तर सर्व क्रिया शुभ होऊन शोभन-कर होवोत. शुक्र, मंगळ, बुध, गुरु, शनि, राहु, केतु, सोमरहित सूर्य वगैरे सर्व ग्रह संतुष्ट होवोत. तिथि, करण, मुहूर्त, जन्मनक्षत्र, दिग्देवता संतुष्ट

**प्रीयत्वां।। भगवती कात्यायनी प्रीयतां।। भगवती माहेश्वरी प्रीयतां।। भगवती पुष्टिकरी प्रीयतां, भगवती तुष्टिकरी प्रीयतां, भगवती ऋद्धिकरी प्रीयतां, भगवती वृद्धिकरी प्रीयतां, भक्तमाहेश्वराः प्रीयंतां, भगवान्सर्वात्मकः श्रीपरमेश्वरः प्रीयतां।। इत्युत्तरकलशोदकं किंचित्किंचिदन्यपात्रे विसृज्य।।हताः परिपंथिनो हता अस्य कर्मणो विघ्नकर्तारः शत्रवः पराभवं यान्तु शाम्यन्तु घोराणि, शाम्यन्तु पापानि, शाम्यन्त्वीतयः।।इति नैऋत्यां पूर्ववत्।।**

**शुभानि वर्द्धतां, शिवा आपः सन्तु, शिवा ऋतवःसन्तु, शिवा आहुतयः सन्तु, शिवा ओषधयः सन्तु, शिवा वनस्पतयः सन्तु, शिवा अतिथयः सन्तु, अहोरात्रे शिवे स्यातां, निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु। फलिन्यो न औषधयः**

पच्यन्तां।। योगक्षेमो नः कल्पतां।। इति पूर्ववदन्यपात्रे एतत्पात्रस्थोदकमुत्तर-कलशे निक्षिप्य पुण्याहकालान्वाचयिष्ये वाच्यतामिति प्रतिब्रूयुः ।। उद्भतेव शकुने साम्मगायसि। ब्रह्मपुत्र इवं सवनेषु शससि। वृषेव वाजी शशिमतीरपी-त्या सर्वतो नः शकुने भद्रमावद विश्वतो नः शकुने पुण्यमावद ।। याज्यया-यजति प्रत्तिर्वै याज्याः पुण्यां लक्ष्मीः पुण्यामेव तल्लक्ष्मी संभावयति पुण्यां लक्ष्मी सस्कुरुते यत्पुण्यं नक्षत्रं । तद्धटकुर्वीतोपव्युषं । यदा वै सूर्य उदेति
असोत. माहेश्वरी वगैरे मातृगण संतुष्ट होवो, भगवती कात्यायनी प्रीत असो, भ-गवती माहेश्वरी प्रीत असो, भगवती पुष्टिकरी प्रीत असो, भगवती तुष्टिकरी प्रीत असो, भगवती ऋद्धिकरी प्रीत असो, भगवती वृद्धिकरी प्रीत असो, भक्तमाहेश्वर प्रीत असोत, भगवान् सर्वव्यापी परमेश्वर प्रीत असो, असें ह्मणून डाव्या कलशांतले पाणी दुस-या पात्रांत थोडें घेऊन शत्रु नष्ट होवोत, या कर्माला विघ्न करणारे नष्ट होवोत, शत्रूंचा पराभव होवो, घोर शांत होवोत, पाप शांत होवोत, ईति शांत होवोत असें ह्मणून पूर्वीप्रमाणे नैऋर्त्यकडे पाणी सोडावें. शुभ वाढोत, उदक शुभ असोत, ऋतु शुभ असोत, आहुति शुभ असोत, ओषधि शुभ असोत, वनस्पति शुभ असोत, अतिथि शुभ असोत, अहोरात्र शुभ होवोत कालकालाला वृष्टि पडो, फलयुक्त ओषधि पक्व होवो (सुबत्ता होवो), योगक्षेम आमचा होवो अशी वाक्यें ह्मणून पूर्वीप्रमाणें दुस-या पात्रांत या पात्रांतले उदक उत्तर कलशांत टाकून पुण्याहलकाचें वाचन करवितों, असें ह्मणून वाचन करीव असें प्रतिवचन माहेश्वरांकडून घ्यावें. "उग्दातेव" पासून
अथ नक्षत्रं नैति। यावति तत्र सूर्यो गच्छेत्। यत्र जघन्यं पश्येत्। तावत्कुर्वीत यत्कारी स्यात्। पुण्याह एव कुरुते।।

(यजमान) मह्यं सकुटुंबाय शुद्धिवृध्द्यभ्युदयकर्मणे भक्तमाहेश्वरमहाजनान्नमस्कुर्वाणायाशीर्वनमपेक्षमाणायामुकशर्मणे पुण्याहं भवन्तोब्रुवन्तु।

(माहेश्वर.) ॐपुण्याहमस्तु। ।इति त्रिवारमुक्त्वा।।

खस्तये वायुमुपब्रुवामहै। सोम स्वति भुवनस्ययस्पतिः। बृहस्पति सर्वगणं स्वस्तये। स्वस्तय आदित्या-सो भवन्तु नः। आदित्य उदयनीयः।पथ्यैवेतः

वनेषु शससि। ऋषे (व) वाजी शिशुमतीरपीत्यासर्वतोनः शकुने भद्रमावद। विश्वतोतः शकुने पुण्यमावद। इतिऋचं सवैःसह पठित्वा। ॐपुण्याहं भवंतो ब्रुवंत्विति स्वयं मंद्रस्वरेणोक्त्वा। माहेश्वरैरेव पुण्याहमिति तथोक्ते। पुनरेव मध्यस्वरेणोक्त्वा। तथैव तैरूक्ते। पुनरेवोच्चैःस्वरेणोक्त्वा। तथैव तैरुक्ते। स्वस्ति न इंद्रो वृद्धश्रवाः स्वस्तिनः पूषा विश्ववेदाः। स्वस्तिनास्ताइर्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्तिनो मघवा धात्विंद्रः। इति ऋचं सर्वैः सह पठित्वा।। ॐ स्वस्तिभवंतो ब्रुवंत्विति पूर्वपदुक्त्वा दीक्षाकर्मणः स्वस्तीति तैरुके। स्वस्तिदीक्षाकर्मणे भवंतो ब्रुवंत्विति करिष्यमाणकर्मनाम पूर्ववदुक्त्वा। दीक्षाकर्मणे स्वस्तीति तैरुक्ते। ऋभ्द्यामस्तोमसनुयाम वाजमानो मंत्रसरथे होपयातं। यशोन पक्वं मधु गोष्वंतराभ्रूतां शो अश्विनोः काममप्राः इति ऋचं सर्वैःसह पठित्वा ऋद्धिंभवंतो ब्रुवंत्विति पूर्ववदुक्तेऋद्धयतामिति तैस्तथैव प्रत्युक्ते। सामात्यः प्राङ्मुख उपविश्य। ततो माहेश्वराः प्राङ्मुखमुपविश्य तद्वृद्धिकलशोदकं विशाले ताम्रादिपात्रे निनीय यजमानं सामात्यं मंत्रैरभिर्षिचेयुः। तेच मंत्राः ॐतत्सवितुर्वरेण्यं विश्वामित्रः

सर्वांसह पठण कराव्या. "ॐ पुण्याहं भवंतो ब्रुवंतु" असे स्वतः मंद्र (गंभीर व मंद) स्वरानें ह्मणून, "पुण्याहः" असें माहेश्वरांकडून ह्मणवावें. नंतर याचप्रमाणें मध्यम स्वरानें व उच्चस्वरानेंही ह्मणावे "स्वस्ति न इंद्रो०" इत्यादि ऋचा, नंतर, सर्वांसह ह्मणाव्या. "ॐ स्वस्ति भवंतो ब्रवंतु" असें आपण ह्मणावें. "दीक्षाकर्मणः स्वस्ति" असें त्यांनी ह्मणावें. "स्वस्ति दीक्षाकर्मणे भवंतो ब्रुवंतु" असें पूर्वीप्रमाणें ह्मणावें. "दीक्षाकर्मणे स्वस्ति" असें त्यांनी ह्मणावें नंतर, "ऋद्धयामस्तोमसनुयाम०" इत्यादि ऋचा सर्वांसह ह्मणाव्या. "ऋद्धिं भवंतो ब्रुवंतु" असें आपण ह्मणावें. "ऋद्धयताम्" असें त्यांनी प्रत्युत्तर दिल्यानंतर अमात्यांसह पूर्वमुख बसून, नंतर महेश्वरांनीही पूर्वमुख बसवून, तद्वृद्ध्यर्थ असलेलें कलशोदक विशाल अशा ताम्रपात्रामध्यें घालून अमात्यांसह यजमानास मंत्रांनीं अभिषेक करावा. ते मंत्र येणेंप्रमाणे - "ॐ तत्सवितुः०" इत्यादिक (मूळांत पाहावे). इत्यादिक मंत्रांनीं

सविता गायत्री । आपोहिष्ठेति नवर्चस्यांबरीषः। सिंधुद्वीपआपो गायत्री। पंचमीवर्धमाना सप्तमी प्रतिष्ठें त्ये द्वे अनुष्टुभौ। आपोहिष्ठा मयो भ्रुवस्तान ऊर्जे दधा तन। महेरणाय चक्षसे। घोवः शिवतमो रसस्तस्य भ्राजयते हनः। उशतीरिवमातरः । तस्मा अरंगमामवो यस्य क्षयाय जिन्वथ । आपो जनयथाचनः ।। शंनो देवीरशिष्टय आपोभवंतु पीतये। शंयोरभिस्त्रवंतुनः। देवस्य त्वा सवितुः प्रसवेश्विनोर्बाहुभ्यां पूष्णोहस्ताभ्यामश्विनोर्भैषज्येन तेजसे ब्रह्मवर्चसायार्भिषिंचामि। देवस्यत्वा सवितुः प्रसवेश्विनोर्बाहुभ्यां पूष्णोहस्ताभ्यां सरस्वत्यै भैषज्येन वीर्याभावाद्यायाभिर्षिचामि। देवस्यत्वासवितुः प्रसवेश्विनोर्बाहुभ्यां पूष्णोहस्ताभ्यां इंद्रस्येंद्रियेण श्रियै यशसे बलायाभिषिंचामि।। अमृताभिषेकोस्तु इति सपल्लवैरभिर्षिचेयुः।। ततः सुवासिनीभिः नीराजनं कार्यं ततो माहेश्वराणां वैदिकाशिषो ग्राह्या इति पुण्याहवाचनम्।।

।। अथ नांदी।। तंडुलपूरितपात्रे फलं निधाय चतुर्विंशति माहेश्वराराधनपरिमितं हिरण्यं दद्यात् ।। तद्यथा।। देशकालौ संकीर्त्य अस्यां शुभतिथौ दीक्षिष्यमाणस्तदादौ नांदीशोभनदेवताप्रीत्यर्थं नांदीसमाराधनं करिष्ये इति संकल्प्य।। श्रीनंदिभृंगिरिटिवीरवीरभद्र पुष्पदंतचंडाभरणदंडपाणिचंडेश्वरदारुकरेणुकविकर्णविजयकर्णघंटाकर्णरेणुकर्णगोकर्णरेवणसिद्धमरुळसिद्धएकोरामाध्यपंडिताराध्यसुकेतुरुरुउपमन्युभृगुदधीचिगौतमादिप्रमथगणान् पुरातनभक्तमहागणा-

हाती पानें घेऊन अभिषेक करावा. नंतर सुवासिनींनी नीराजन करावें. नंतर माहेश्वरांकडून वैदिक आशीर्वाद ग्रहण करावेतं. ।। इति पुण्याहवाचनम् ।।

।। अथ नांदी।। तांदुळानें भरलेल्या पात्रामध्यें कलश ठेवून २४ माहेश्वरांच्या आराधनांस पुरेसे हिरण्य द्यावें. तें येणेप्रमाणे :- देशकालांचे संकीर्तन करून "अस्थांशुभतिथौ०" इत्यादिक संकल्प करावा. नंतर, "श्रीनंदी, भृंगिरिटि,"इत्यादिकांनीं

नत्रावाहयामि। नंद्यादिमहागणाः सायुधाः सशक्तयः सपरिवाराः समागत्यात्र पूजां भवंतो गृहंतु इति विज्ञाप्य । अष्टविधार्चनं कुर्यात।। "हिरण्यगर्भगर्भस्थं हेमबीजं विभावसोः ।। अनंतपुण्यफलदमतश्शांतिं प्रयच्छ मे।।" अनेन हिरण्येन नांदीशोभनदेवताः प्रीयंताम् इति द्रव्यं दद्यात् ।। चतुर्विंशतिमाहेश्वरराधनं कुर्यात् इति।। नांदीविधानम्।।

अथांकुरार्पणम् ।। प्राणानायम्य देशकालौ संकीर्त्य दीक्षाकर्मसाफल्य-निरंतरशुभत्वसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमंकुरार्पणं करिष्ये।। इति संकल्प्य।। शुद्धभूमिं गोमयेनोपलिप्य।। रंगवल्यादिभिरलंकृत्य। तत्र सिताक्षतान् प्रकीर्य किंचिद्गंभीरं नववेणुमात्रं सूत्रेणावेष्ट्य तदेव पालिकात्वेन संस्थाप्य वल्मीकमृदं ह्रदपंकं शुष्कगोमयचूर्णं तत्र निक्षिप्य पालिकामुलं श्वेततंडुलैः पूरयित्वा दूर्वांकुराश्वत्थशिरीषबिल्वपत्राणमुपरि शुभे मूहूर्ते तत्पात्रं निक्षिप्य तत्र सितरक्तहरिद्वर्णादिपुष्पाण्यवकीर्य मध्यादिपंचस्थानेषु ईशानादिपंचमूर्तीन् पूजयेत् ।। षोडशोपचारैः पंचमूर्तीन् सम्यगभ्यर्च्य पालिकाप-

विज्ञापना करून प्रथम गणांचे अष्टविध अर्चन (पूजा) करावें. "हिरण्यगर्भ०" इत्यादिकांनी "या सुवर्णाने नांदीशोभनदेवता संतुष्ट होवो" असें ह्मणून द्रव्य द्यावें; व नंतर २४ माहेश्वरांची यथाविधि पूजा करावी. ।। इति नांदीविधानम्।।

।। अर्थ अंकुरार्पणम्।। प्राणायाम करून देशकालादिक संकीर्तन करून "दीक्षाकर्म०"—इत्यादि संकल्प करावा. शुद्ध भूमि गोमयानें सारवून, रांगोळीनें अलंकृत करून, तेथें पांढ-या अक्षता टाकून, किंचित् गंभीर असें नूतन वेणूचें (वेळू; बांबू) पात्र घेऊन, त्यास सुताचें आवेष्टन (गुंडाळणें) करून, तेंच "पालिका" (बोळकीं) आहे असें समजून त्याची स्थापना करावी. वारूळाची माती, सरोवरांतील कमळ, व शुष्क गोमयाचें चूर्ण, तेथें घालून "पालिकेचे मूळ श्वेत तांदुळांनें भरून, दूर्वांकूर, अश्वत्थ (पिंपळ), शिरीष, व बिल्व-यांच्या पानांवर शुभ मुहूर्तीं ते पात्र ठेवून तेथें पांढरीं, तांबडीं, पिंवळीं, इत्यादि प्रकारची फुले टाकावींत. मध्य आदिपंचस्थानीं, नंतर, ईशानादि पंचमूर्तींची पूजा करावी.

श्विमतः प्राङ्मुखस्तिष्ठन्नुपतिष्ठेत्। "दिशांपतीन्नमस्यामि सर्वकामफलप्रदान्।। कुर्वंतु सततं कर्म कुर्वंतु सततं शुभम्।।"

।। ततः ।। व्रीहिमुद्गचणतिलगोधूमपंचधान्यानि तोयेन प्रक्षाल्य ईशान्यादि पंचस्थानेषु समंत्रकं वापयेत् ।। तत्र ईशानादिपंचब्रह्ममंत्राः ।। इत्यंकुरार्पणम् ।।

अथ मंटपदेवाताप्रतिष्ठा ।। अथ सर्वैरनुज्ञाय । याजाता ओषधयो देवेभ्यस्त्रियुगंपुरा। तासांपर्वराभ्यासं परिस्तर माहरन्।। मंदामिबभ्रूणामह शतंधामानि सप्तच शतंवो अंबधामानि सहस्त्रमुतवोरुहः।। अथशतकृत्वो यूयमिमं मे अगदं कृत । पुष्पावतीः प्रसूवतीः फलिनीरफलाउत। अश्वाइव सजित्वरीः वीरुधः पारयिष्णवः । याः फलिनीर्याअफला अपुष्पा याश्च पुष्पिणीः। बृहस्पतिप्रसूतास्तानो मुंचंत्वहसः। इतिमंटपोपरि अक्षतान्निक्षिप्य। अथ शतरुद्रानावाहयेत् ।। तदेवमिंद्रदिशि।। त्रातारमिंद्रमवितारमिंद्रंहवेहवे सुहव शूरमिंद्रं । हुवेनु (म) शक्रं पुरुहूतमिंद्रस्वस्तिनो मघवा धात्विंद्रः। अनोर्नेद्रं । कपिलेशाय नमः । अजाय नमः । बद्धाय नमः । वज्रदेहायनमः । प्रमर्दनाय नमः। विभूतये नमः। अव्ययाय नमः।शास्त्रेनमः। पिनाकिने नमः। त्रिदशाधिपाय नमः ।

षोडशउपचारांनीं पंचमूर्तींची चांगली पूजा करून पालिकेच्या पश्चिमेभागीं पूर्व-मुख राहून उपस्थान (पूजा) करावें. "दिशांपती०" इत्यादि ह्मणावें. नंतर, व्रीहि (एक प्रकारचें भात) मूग, तीळ, गहूं-हीं पांच धान्यें पाण्यानें धुवून, ईशान्यादि पंचस्थानीं समंत्रक पेरावींत. ते ईशानादि पंच ब्रह्ममंत्र होत!

।। इति अंकुरार्पणम् ।।

।। अथ मंटपदेवताप्रतिष्ठा।।

सर्वांची संमति घेऊन "याजाता ओषधयो०" इत्यादि (मूळांत पहावें) मंत्रांनीं मंडपाच्या वर अक्षता घालाव्यात. नंतर १०० रुद्रांचे आवाहन करावे; तें असेः- (पूर्व दिशेस) "त्रातारभिंद्र०" इत्यादि मंत्रानें इंद्राचें आवाहन; व "कपिलेशाय-

इंद्रवीर्या इंद्रपूजिताः हे दशरुद्राः सवाहनाः सशक्तयः सपरिवाराः समागत्यात्र मंटपे मत्कृतानशेषोपचारान्स्वीकृत्य प्रसीदंतु भवंतः। इत्यावाह्य।। पूजयेत्।। अथाग्नेय्यां दिशि। त्वंनो अग्ने वरुणस्य विद्वान् देवस्य हेडो वयासि सीष्ठाः।। यजिष्ठोवन्हितमः शोशुचानो विश्वाद्वेषा सिप्रमुमुग्धस्मत्।। अनेनाग्निमावाह्य।। अग्निवीर्याय नमः । हुताशिने नमः ।। पिंगलाय नमः। खादकाय नमः। हराय नमः। ज्वलाय नमः। दहनाय नमः। बभ्रवे नमः। भस्मांतकाय नमः। क्षयांतकाय नमः अग्निवीर्याः अग्निपूजिताः हे दशरुद्राः इत्यादि पूजांतं पूर्ववत्।। अथ यमदिशि।। सुगंनः पंथामभयंकृणोतु। यस्मिन्नक्षत्रे यमयेति राजा। यस्मिन्नेनमभ्यषिंचंत देवाः। तदस्य चित्र हविषा यजाम इति यमं। तत्र। विधात्रे नमः। कर्त्रे नमः। धात्रे नमः। श्रीकामाय नमः। सर्वनियोके नमः। याम्येशाय नमः। रमेशाय नमः। संयोके नमः। हराय नमः। यमपूजिता यमवीर्या हे दशरुद्राः । इत्यादि पूजांतं पूर्ववत्।। अथ नैऋत्यां दिशि।। असुन्वं तमयजमानमिच्छस्तेनस्तेत्यांतस्करस्यान्वेषि । अन्यमस्मदिच्छसात इत्यानमोदेवि निऋते तुभ्यमस्तु। अनेन निऋतिं आवाह्य। तत्र। नैऋतेशाय नमः वरुणाय नमः । हंत्रे नमः। क्रूरदृष्ट्ये नमः। भयानकाय नमः। ऊर्ध्वकेशाय नमः। विरूपाक्षाय नमः। धूम्राय नमः लोहिताय नमः । दंष्ट्रकाय नमः।

नमः०" इत्यादिकांच्या योगें इंद्रपूजित. दशरुद्रांस आवाहन करून, त्यांचीं पूजा करावी. (आग्नेय दिशेस) "त्वं नो अग्ने०" इत्यादिकांनें अग्नीचे आवाहन; व "अग्निवीर्याय नमः०" इत्यादिकांनी पूर्ववत् अग्निपूजित दशरुद्रांचे आवाहन करून पूजा करावी. (दक्षिण दिशेस) "सुगं गः पंथामभयं०" इत्यादि मंत्रांनीं यमाचें आवाहन; व "विधात्रे नम०" इत्यादिकांनी यमपूजित दशरुद्रांचे आवाहन, करून त्यांची पूर्ववत् पूजा करावी (नैऋत्य दिशेस) "असुन्वंत०" इत्यादि मंत्रानें निऋतीचें आवाहन, व "नैऋतेशाय नमः०" इत्यादिकांनी निऋतिपूजित

**नैॠतिवीर्याः नैॠतिपूजिताः हे दशरुद्राः । इत्यादि पूजांतं पूर्ववत्।। अथ वरुणदिशि।। तत्वायामि ब्रह्मणा वंदमानस्तदाशास्ते यजमानो हविर्भिः। अहेडमानो वरूणेह बोध्युरूश समान आयुः प्रमोषीः।। अनेन वरुणमावाह्य।। बलाय नमः । अतिबलाय नमः। पाशहस्ताय नमः। महाबलाय नमः। श्वेताय नमः। जयभद्राय नमः। वरुणवीर्या वरुणपूजिताः हे दशरुद्राः । इत्यादिपूजांतं पूर्ववत् ।। अथ वायव्यदिशि ।। आनो नियुभ्दिः शतिनीभिरध्वरं । सहस्त्रिणीभिरुपयाहि यज्ञं । वायो अस्मिन् हविषमादयस्व। यूयं पातु स्वस्तिभिः सदानः।। हत्यनेन वायुमावाह्य ।। अत्र ।। शीघ्राय नमः । लघवे नमः । वायुवेगाय नमः । सूक्ष्माय नमः । तीक्ष्णाय नमः। भयंकराय नमः । पंचात्मकाय नमः। पंचशिखाय नमः। कपर्दिने नमः । मेघवाहनाय नमः। वायुवीर्याः वायुपूजिताः हे दशरुद्राः इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।। अथ कुबेरदिशि ।। वय सोमव्रते तव मनस्तनूषुबिभ्रतः। प्रजावंतः सचेमहि। इंद्राणी देवी सुभगा सुपत्नी । इत्यनेन कुबेरमावाह्य ।। तत्र ।। निधीशाय नमः। रूपवते नमः। धन्याय नमः । सौम्याय नमः। शांताय नमः। जटाधराय नमः। कामप्रसादाय नमः। लक्ष्मीशाय नमः । प्रकाशाय नमः । इंदुयज्ञपाय नमः। कुबेरवीर्या कुबेरपूजिताः हे दशरुद्राः**

दशरुद्रांचे आवाहन करून त्यांची पूर्ववत् पूजा करावीं. (पश्चिमदिशेस) "तत्वा यामि०" इत्यादि मंत्रांनीं वरुणाचें आवाहन; व "बलाय नमः०" इत्यादिकांनी वरुणपूजित दशरुद्रांचे आवाहन करून त्यांची पूजा करावी. (वायव्य दिशेस) "आनो नियुभ्दिः०" इत्यादि मंत्रानें वायूचें आवाहन; व "शीघ्राय नमः०" इत्या-दिकांनीं वायुपूजित दशरुद्रांचे आवाहन करून त्यांची पूर्ववत् पूजा करावी ( उत्तर दिशेस ) वय सोमव्रते०" इत्यादि मंत्रानें कुबेराचें आवाहन करून व " निधीशाय नमः " इत्यादिकांनी कुबेरपूजित दशरुद्रांचे आवाहन

इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।। अथ ऐशानदिशि।। तमीशानं जगतस्तस्थुषस्पतिम्।। धियं जिन्वमवसे हमहे वयम् । पूषानो यथावेदसामसद्वृधे । रक्षितापायुरदब्ध स्वस्तये। इत्यनेन ईशानमावाह्य ।। तत्र ।। ईशानाय नमः । विद्येशाय नमः। ज्ञानवते नमः । मातृपिंगलाय नमः । भूतपालाय नमः । अजाय नमः । बलये नमः । मित्राय नमः । सर्वविद्याधिपाय नमः । सुखकृते नमः। ईशानवीर्या ईशानपूजिता हे दशरुद्राः इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।। अथ वायव्यपश्चिमयोर्मध्ये अधस्तात् अधोदिशि ।। स्योना पृथिवी भवानृक्षरानिवेशिनी ।। यच्छानः शर्म सप्रथाः ।। इत्येनन विष्णुमावाह्य ।। तत्र ।। बलिप्रियाय नमः । विषधराय नमः । वीरोग्रसनाय नमः । पालकाय नमः । शुभाय नमः । सुवीर्याय नमः । वृषभाय नमः । पातालेशाय नमः । लोहिताय नमः । अनंताय नमः । विष्णुवीर्याः विष्णुपूजिताः हे दशरुद्रा इत्यादिपूजांतं पूर्ववत् ।। अथ पूर्वेशानयोर्मध्ये ऊर्ध्वमूर्ध्वदिशि ।। अस्मे रुद्रा मेहनापर्वतासो वृत्रहत्ये भरहूतौ सजोषाः । यः शंसते स्तुवते धायि वज्रमिंद्रज्येष्ठा अस्मान् अवंतु देवाः।। इत्यनेन ब्रह्माणमावाह्य ।। अध्यक्षा नमः। नभसे नमः । लिप्सवे नमः । शंभवे नमः । विभवे नमः । गणाध्यक्षाय नमः । विवाहाय नमः । गुणसंवाहाय नमः । त्र्यक्षाय नमः । त्रिदशवंदिताय नमः।

करून त्यांची पूर्ववत् पूजा करावी. (ईशान दिशेस) "तमीशान०" इत्यादि मंत्रानें ईशानाचें आवाहन करून व "ईशानाय नमः" इत्यादिकांनी ईशानपूजित दश रुद्रांचे आवाहन करून त्यांची पूजा करावी. (वायव्य व पश्चिम यां दोहोंमधील अधस्तात् (खाली) खालील दिशेस) "स्योना पृथिवी०" इत्यादि मंत्रानें विष्णूचे आवाहन करून, व "बलिपियाय नमः" इत्यादिकांनी विष्णुपूजित दशरुद्रांचे आवाहन करून त्यांची पूजा करावी. (पूर्व व ईशान्य या दोहोमधील ऊर्ध्व दिशेस) "अस्मे रूद्रा मेहना." इत्यादिकांने ब्रह्माचें आवाहन; व " अध्यक्षायनमः " इत्यादिकांनी ब्रह्म-

ब्रह्मवीर्या ब्रह्मपूजिताः हे दशरुद्रा इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।। एवं शतरुद्रान् तत्तद्दिक्ष्वावाह्य पूजयेत् ।।

अथ शिवलिंग संस्कुर्यात् ।। मंटपस्योत्तरभागे भूमिं गोमयेनोपलिप्य गोमूत्रगोमयक्षीरदधिघृतैस्तत्तन्मंत्रेण मार्जयित्वा । रोचनो रोचमानः शोभनो शोभमानः कल्याण इति गोरोचनया संमार्जयेत् ।। षड्भिर्मंत्रैः षड्गव्यैः सकृदेव संमार्जनम् । मंडलं विध्याय रंगवल्ल्यादिभिरलंकृत्य । ताम्रपात्राद्यन्यतमपात्रं तत्र निक्षिप्य । स्फाटिकश्री शैलजरजतादिष्वेकतमं पंचसूत्रघटितं शिवलिंगमादाय वेदमंत्रैः प्रक्षाल्य। वारूणे भागे पात्रे निक्षिप्य । पूजाद्रव्याणि संपाद्य । यजमानः प्राणानायम्य एवं गुणेत्यादिशुभतिथौ कर्षणादिदोषशांत्यर्थं "हिरण्यशृंगं पवमानः सुवर्जनः नमस्ते रुद्रमन्यव" इत्यनुवाकैः शिवलिंग स्नापयिष्ये इति संकल्प्य।। अनुवाकक्रममाह ।। हिरण्यशृंगं वरुणं प्रपद्ये। तीर्थं मे देहि याचतः । यन्मया भुक्तमसाधूनां पापेभ्यश्च प्रतिग्रहः । तन्न इंद्रो वरुणो राजा पाणिनाह्यवमर्शत् ।। यन्मे मनसा वाचा कर्मणा वा दुष्कृतं कृतं । तन्न इंद्रो वरुणो बृहस्पतिः सविता च

पूजित दशरुद्रांचे आवाहन करून त्यांची पूर्ववत् विधिवत् पूजा करावी, याप्रमाणे १०० रुद्रांचे त्या त्या दिशेस आवाहन करून त्यांची पूजा करावी.

**अथ शिवलिंग संस्कुर्यात।।** आतां शिवलिंगाला संस्कार करावा. तो असा मंडपाच्या उत्तर भागी भूमि गोमयानें सारवून, गोमूत्र, गोमय, क्षीर (दूध) दही, तूप, इत्यादिकांनीं मंत्रयोगें मार्जन करावें. "रोचना०" इत्यादिकानें गोरोचनानें मार्जन करावें. षड्गव्यांनीं व सहाही मंत्रानीं एकच वेळ मार्जन करावें. मंडळ करून रांगोळींने अलंकृत करावें. तांब्याचें वगैरे पात्रापैकी कोणतेही पात्र तेथें ठेवावें. स्फटिकाचे, श्रीशैलजाचें, अगर रुप्याचें; पंचसूत्रांनी घटित असें शिवलिंग आणून वेदमंत्रांनी त्यांचे प्रक्षालन करावें. पश्चिम भागी मग तें पात्रांत ठेवून, पूजेचे सामान आणून, यजमानानें प्राणायाम करून. "एवंगुणे" त्यादि (मूळांत पहावें) संकल्प करावा. अनुवाकांचा क्रम. "हिरण्य-श्रृंग०" इत्यादि अनुवाकांनी (मूळांत पहावें) शिवलिंगास स्नान घालावें. पंचोप-

पुनंतु पुनःपुनः।। नमोऽग्नयेऽप्सुमते नम इंद्राय नमो वरुणाय नमो वारुण्यै नमोऽभ्द्यः। यदपां क्रूरं यदमेध्यं यदशांतं तदपगच्छतात् । "अत्याशनादतीपानाद्यच्च उग्रात् प्रतिग्रहात् ।। तन्मे वरुणो राजा पाणिना ह्यवमर्शतु।।" "सोऽहमपापो विरजो निर्मुक्तो मुक्तकिल्बिषः।। नाकस्य पृष्ठमारुह्य गच्छेदह्मस लोकताम्" यश्चाप्सु वरुणस्स पुनात्वघमर्षणः । पवमानः सुवर्जनः । पवित्रेण विचर्षिणिः । यः पूता स पुनातु मा । पुनंतु मा देवजनाः । पुनंतु मनवो धिया । पुनंतु विश्व आयवः । जातवेदः पवित्रवृत् । पवित्रेण पुनीहि मा । शुक्रेण देव दीद्यत् ।। अग्ने कृत्वा क्रतू रनु । यत्ते पवित्रमर्चिषि । अग्ने विततमंतरा ब्रह्म तेन पुनीमहि । उभाभ्यां देव सवितः । पवित्रेण सवेन च । इदं ब्रह्म पुनीमहि । वैश्वदेवी पुनति देव्यागात् । यस्यै बव्हीस्तनुवो वीतपृष्ठाः । तया मदंतःसधमाद्येषु । वय स्याम पतयो रयीणां । वैश्वानरो रश्मिभिर्मा पुनातु । वातः प्राणेनेषिरो मयोभूः । द्यावापृथिवी पयसा पयोभिः । ऋतावरी यज्ञीये मा पुनीतां । बृहभ्द्विः सवितस्तृभिः । वर्षिष्ठैर्देवमन्वभिः। अग्ने दक्षैः पुनाहि मा। येन देवा अपुनत। येनापो दिव्यं कशः । तेन दिव्येन ब्रह्मणा । इदं ब्रह्म पुनीमहि। यः पावमानीरध्येति। ऋषिभिः संभृत रसं । सर्व सपूतमश्नाति । स्वदितं मातरिश्वना । पावमानीर्यो अध्येति । ऋषिभिः संभृत रसः। तस्मै सरस्वती दुहे। क्षीर सर्पिर्मधूदकम् । पावमानीः स्वस्त्ययनीः । सुदुघा हि पयस्वतीः ऋषिभिःसंभृत रसः । ब्राह्मणेष्वमृत हितम् । पावमानीर्दिशंतु नः। इमं लोकमथो अमुम् । कामान् समर्द्धयंतु नः । देवीर्देवैः समाभृताः । पावमानीः स्वस्त्ययनीः । सुदुघा हि घृतश्रुतः । ऋषिभिः संभृतो

रसः । ब्राह्मणेष्वमृत हितम् । येन देवा अपुनत । आत्मानं पुनते सदा । तेन सहस्त्रधारेण । पावतान्यः पुनंतु मा । प्राजापत्यं पवित्रं । शतोद्यान हिरण्मयं । तेन ब्रह्मविदो वयम् । पूतं ब्रह्म पुनीमहि । इंद्रः सुनीती सहवा पुनातु । सोमस्वस्त्या वरुणःसमीच्या । यमो राजा प्रमृणाभिः । पुनातु मा । जातवेदा मूर्जयंत्या पुनातु । नमस्ते रुद्रमन्यव ............ अस्मिन्निधेहितम् ।। इत्युनुवाकैश्च शिवलिंग संस्नाप्य।। पुनः प्राणानामस्य देशकालावनुकीर्त्य ।। पुनः कर्पणाग्नितप्तादिपापशांत्यर्थं जलाधिवासं कारयिष्ये।। इति संकल्प्य ।। गंगादितीर्थांबुपंचगव्यभसितमिश्रोदकैः पूरितपात्रे लिंगस्थलं सकूर्चाभ्यां वस्त्राभ्यां समावेष्ट्य निक्षिप्य अभिमर्शनपूर्वकं अष्टोत्तरशतषडक्षरमंत्रेणाभिमंत्र्य।। तत्तत्कालो चितं जलाधिवासं कारयित्वा ततस्तल्लिंगं जलादुद्धृत्य। अन्यमंडले तल्लिंगस्थलं स्नपनपात्रे निक्षिप्य। वेष्टितवस्त्रं व्यपोह्य। पंचगव्यैर्भस्मोदकैर्गंधतोयैः संस्नाप्य । गंधादिभिरभ्यर्च्य । पुनस्तत्र षटसंमार्जनेन भुशुद्धिं कृत्वा मंडलस्य ईशानदिशि रंगवल्ल्यादि-नाष्टदलपद्मं विलिख्य । सप्तहस्तप्रमाणं वस्त्रमाच्छाद्य तदुपरि अंगुलप्रमाणं

चारांनी पुजा करावीं. पुनः प्राणायाम करून, देशकालादिकांचे अनुकीर्तन, करून, "कर्षणाग्नि०" इत्यादि संकल्प करावा. गंगादि तीर्थांचे पाणी, पंचगव्य व भस्म यांहीं मिश्रित अशा पाण्यानें भरलेल्या पात्रांत सकूर्च अशा दोन वस्त्रांनीं लिंगस्थल वेष्टून, तें तेथें ठेवून अभिमार्जन करितांनां १०८ वेळा षडक्षरीं मंत्रानें अभिमंत्रित करावें. त्या त्या काळी उचित असा जलाधिवास करवून नंतर तें लिंग पाण्यांतून बाहेर काढून, दुस-या मंडळांत तें लिंगस्थळ स्नान घालण्याच्या पात्रांत ठेवून, वेष्टन केलेले वस्त्र काढून टाकावें नंतर पंचगव्य, भस्मोदक, व गंधोदक, यांनी स्नान घालून, गंधादिकांनी पूजा करावी पुनः तेथें षटसंमार्जनानें भूशुद्धि करून, मंडलाच्या ईशान्यदिशेस रांगोळी वगैरेनी अष्टदल पद्म लिहून, सप्तहस्तप्रमाण वस्त्रानें आच्छादन करून, त्यावर

श्यामार्कः स्थंडिलं कृत्वा अष्टदलपद्मं विरच्य वस्त्रमाच्छाद्य। तदुपरि तिलैः स्थंडिलं कृत्वा अष्टदलपद्मं च रचयित्वा वस्त्रमाच्छाय । तदुपरि गोधूमैः स्थंडिलं कृत्वा अष्टदलकमलं च लिखित्वा तदुपरि वस्त्रमाच्छाद्य। तदुपरि ब्रीहिभिः स्थंडिलं कृत्वा अष्टदलपद्मं लिखित्वा तदुपरि वस्त्रमाच्छाद्य। तदुपरि तंडुलैःस्थंडिलं कृत्वा अष्टदलपद्मं विलिख्य तदुपरि वस्त्रमाच्छाद्य । तदुपरि चूतबिल्वामलककुशापामार्गपत्राणि निक्षिप्य । तदुपरि वस्त्रमाच्छाद्य।। प्राणानायम्य । देशकालावनुकीर्त्य । अस्यां शुभतिथौ शांत्यर्थ शयनार्थ धान्याधिवासं करिष्ये इति संकल्प्य ।। तल्लिंगस्थलं सकूर्चेन वस्त्रयुग्मेन संवेष्ठ्य तत्पुरुषमंत्रेण प्राक्शिरस्कमधःसूत्रं निक्षिप्य ।। वामपाणिना स्पृशन् सीत्कारप्राणायामेन सहस्त्रमूलमंत्रेणाभिमंत्र्य। धान्याधिवासं कृत्वा । अनंतरं शयनाल्लिंगमुद्धृत्य लिंगस्थलमादाय भस्मतोयैर्गंधोदकैः सद्योजातमंत्रेण संस्नाप्य पंचोपचारैरभ्यर्च्य ।।

अंगुळभर श्यामाक धान्याचें स्थंडिल करून अष्टदलपद्म लिहून वर वस्त्रानें झांकावें. त्यावर तिळांचें स्थंडिल करून अष्टदल पद्म लिहून वर वस्त्राचें आ-च्छादन घालावें. नंतर गव्हांचें स्थंडिल करून अष्टदल पदम घालून वस्त्राचें आच्छादन घालावें. त्यावर तांदुळांचे स्थंडिल करून अष्टदलपद्म लिहून वर वस्त्रानें आच्छादित करावें. त्यावर आंब्याचीं, बिल्वाचीं, आंवळ्याचीं, कुशाचीं, आघाड्याचीं, पानें घालून, वर वस्त्राचें आवरण घालावें. नंतर प्राणायाम करून देशकालादिकांचे अनुकीर्तन करून "अस्यां शुभतिथौ०" इत्यादि संकल्प करावा. तें लिंगस्थल सकूर्च वस्त्रद्वयानें संवेष्टन करून तत्पुरुष मंत्रानें शिराच्या मागून खाली सून्न ठेवावें. वामहस्तानें स्पर्श करून सीत्कार प्राणायामानें सहस्त्र मूळ मंत्रानें अभिमंत्रित करावें. नंतर धान्याधिवास करून शयनस्थलापासून ते लिंग आणून लिंगस्थळी तें ठेवून, भस्मोदक, व गंधोदक यांहींवरून "सद्योजात०" मंत्रानें स्नान घालून पंचोपचारांनीं पूजा करावी.

**अन्यमंडले तंडुलस्थंडिलोपरिपात्रे लिंगस्थलं निक्षिप्य प्राणानायम्य ।। एवं गुणोत्यादि शुभतिथौ षडध्वशोधनद्वारा शिवकलावाहनार्थ षडध्वशुद्धिं करोमीति संकल्प्य तत्र, अधःपट्टिकां दक्षिणहस्तेन कूर्चेन संस्पृशन् ।। ॐ हां अनाश्रितभुवनाय नमः ।। ॐ हां अनाथभुवनाय नमः ।। २ व्योमरूपिणे नमः । २ ऊर्ध्वगाय नमः । २ मोचिका । २ रोचिका । २ दीपिका । २ इंधिका । २ शांत्यतीता । २ शांति । २ विद्या । २ प्रतिष्ठा । २ निवृत्ति । २ शिखंडी । २ श्रीकंठ । २ त्रिमूर्ति । २ एकरुद्र । एकनेत्र । शिवोत्तमं । सूक्ष्मभू । अनंत । विद्याधिप । ज्वाला । नंदिनी । रूपिणी । अंबिका । स्थाणुमती । ब्रह्मवेताली । त्रिगुणी । मनोन्मन । २ सर्वभूतदमन । बल प्रथमन । बलविकरण । कलविकरण । काल । रुद्र । ज्येष्ठवाम । एकवीर । पंचांतक । सूरग । पिंग । ज्योति । संवर्त । चंड । क्रोधेश । श्रीकंठ । उमा । कुमार । विष्णु । भैरव । कृत । अकृत । ब्रह्म । प्रजेश । सौम्य । इंद्र । गंधर्व । यक्ष । राक्षस । पिशाच । स्थूलेश्वर । स्थलेश्वर । शंखकर्ण । कालांजन । मंडलेश्वर । माकोटि । दुरंड । डालगंड । अनुपमगुणयुत । विदूरक । घोरक । प्रजापति । हुताशन । कालरूपी । विशाल । जटिल । रौद्र । पिंगलाक्ष । कालदंष्ट्र। अजेश । सर्वविभ्दु। भासुर । सुबाहु। मंत्ररूपी । स्थाणु । स्वर्णाक्ष । भद्रकर्ण। गोकर्ण । महाबल । अविमुक्त । रुद्रकोटि । वस्त्रापद । भीम । महेंद्र । अट्टहास । विमल । बल । नाखंडल । कुरुक्षेत्र । गया । भैरव । केदार । मध्यम । महाकाल । मातृकेश्वर । कल्पमान् । श्रीशैल । हरिश्चंद्र । नाकुल । भारतभूति । डिंडि । आषाढी । पुष्कर । नैमिष । प्रभास । अमरेश । त्रिदशवंदित । त्र्यक्ष । गुणसंवाह । विवाह । विचक्षण । विभु । शंभु लिप्सु । नभो । अध्यक्ष । अनंत । लोहित । पातालेश । वृषभ। सुवीर्य । शुभ**

दुस-या एका मंडळांत तांदुळाच्या स्थंडिलावरच्या पात्रांत लिंगस्थळ ठेवून प्राणायाम करून, " एवंगुणेत्वादिशुभ " इत्यादि संकल्प करून तेथील

पालक । वीरोग्रसन । विषधर । बलिप्रिय । सर्वसुखकृत् । सर्व विद्याधिप । मित्र । बल । अज । भूतपाल । मातृपिंगल । ज्ञानवान् । विद्येश । ईशान । इंदुयज्ञप । प्रकाश । लक्ष्मीश । कामप्रसाद । जटाधर । शांत । सौम्य। धन्यरूपवान् । निधीश । मेघवाहन । कपर्दी। पंचशिखी । पंचात्मक । भयंकर । तीक्ष्ण । सूक्ष्म । वायुवेग । लघु । शीघ्र । भैरव। बडबामुख । बलांतक । दीर्घबाहु । जयभद्र । श्वेत । महाबल । पाशहस्त । अतिबल । बल। दंष्ट्रक । लोहित। धूम्र । विरूपाक्ष । ऊर्ध्वरेतो। भयानक । क्रूरदृष्टि । हंतृ । वरूण। निऋतेश । यमपूजित । हर । संयोक्तृ । रमेश । याम्येश । सर्वनियोक्तृ। श्रीकाम । कर्तृ। धातृ । विधातृ । क्षयांतक । भस्मांतक । बृभु। दहन । ज्वलन । हर । खादक । पिंगल । हुताशी । अग्निरुद्र । त्रिदशाधिप । पिनाकी। शास्तृ। अव्यय । विभूति । प्रमर्दन । वज्रदेह । बद्ध । अज । कपिलेश । रौद्र । वैष्णव। ब्राह्म । पाटक । कूष्मांड । कालाग्निरुद्रभुवनाय नमः ।। इति भुवनाध्वन्यासः ।।

तत्पंकजे पदाध्वन्यासः ।। ॐ हां ॐ ।। ॐ हां व्योमव्यापिने । ॐ हां व्योमरूपाय । ॐ हां सर्वव्यापिने । २ शिवाय । २ अनंताय । २ अनाद्याय । २ अनाश्रिताय । २ शिवाय । २ शाश्वताय । २ योगपीठसंस्थिताय । २ नित्ययोगिने । २ ध्यानाधाराय । २ ॐ नमः शिवाय । २ सर्वप्रभवे। २ शिवाय । २ ईशानशिरसे । २ तत्पुरुषवक्राय । २ अघोरहृदयाय । २ वामदेवगुह्याय । २ सद्योजातमूर्तये । ॐ नमो नमः । ॐ हां गुह्यातिगुह्याय । गोत्रे । २ निधनाय । २ सर्वविद्याधिपाय । २ ज्योतिरूपाय । २ परमेश्वरपदाय । २ अचेतानाचेतन । २ व्योम व्योम । ३०।। व्यापिन्

अधः पट्टिकेंत उजव्या हातांतील कूर्चानें स्पर्श करावा. "ॐहं अनाश्रितभुवनाय नमः०" इत्यादि इत्यादि भुवनाध्वन्याय होय.

त्याच पद्मामध्ये पदाध्वन्यास असा करावा. "ॐ हां ॐ "— इत्यादि इत्यादि — पदाध्वन्यास होय!

**व्यापिन् । २ अरूपिन् अरूमिन् । २ प्रथम प्रथम । २ तेजस्तेजः । २ ज्योतिर्ज्योतिः । २ अरूपिन् । २ अनग्नि । २ अधूम । २ अभस्म । २ अनाद । २ नानाना । २ धूधूधू । ॐ भूः । २ ॐ भुवः । २ ॐ स्वः । २ अनिधन । २ निधन । २ निधनोभ्दव । २ शिव । २ शर्व ।।९०।। २ परमात्मन् । २ महेश्वर । २ महातेजः । २ सभ्द्रावेश्वर । २ परमेश्वर । २ महादेव । २ योगाधिपते । २ मुंच मुंच । २ प्रथम प्रथम । शर्व शर्व । २ भव भव । २ भवोभ्दव । २ सर्वभूत सुखोभ्दव । २ सर्वसांनिध्यकर । २ ब्रह्मविष्णुरुद्रपर । २ अनर्चितानर्चित । २ असंस्थितासंस्थित । २ अपूर्वस्थितापूर्वस्थित। २ साक्षिसाक्षि । २ तरू तरू ।७०।। २ पतंग पतंग । २ पिंग पिंग । २ ज्ञान ज्ञान । २ शब्द शब्द । २ सूक्ष्म सूक्ष्म । २ शिवशिव । २ सर्वद । २ ॐ नमो नमः । २ ॐ शिवाय । २ नमो नमः ।८०।। ॐ हां ॐ ।। ८१ ।। इति पदाध्वन्यास ः ।।—**

**अथ तत्कंठे वर्णाध्वन्यासः ।। ॐ हां अं नमः।। ॐ हां आं नमः। ॐ हां हं नमः । ॐ हां ईं नमः । ॐ हां उं नमः। ॐ हां ऊं नमः। ॐ हां ऋं नमः। २ ॐ हां ॠं नमः । २ ॐ हां लृं नमः । २ ॐ हां लॄं नमः। ॐ हां एं नमः । ॐ हां ऐं नमः । २ ओं नमः । २ औं नमः । २ अं । २ अः । २ कं । २ खं। २ गं । २ घं । २ ङ्। २ चं । २ छं। २ जं । २ झं । २ त्र। २ टं । २ ठं । २ डं । २ ढं। २ णं । २ तं । २ थं । २ दं। २ धं । २ नं । २ पं । २ फं । २ बं । २ भं । २ मं । २ यं । २ रं । २ लं । २ वं । २ शं । षं । सं । २ हं । २ ळं । २ क्षं ।।५०।। इति वर्णाध्वन्यासः।।**

**अथोर्ध्वपंकजे कलाध्वन्यासः ।। ॐ हां शांत्यतीतकलायै नमः।**

त्याचप्रमाणें तत्कंठी वर्णाध्वन्यास करावा. "ॐ हां अं नमः०" — इत्यादि इत्यादि — वर्णाध्वन्यास होय!

त्याचप्रमाणे ऊर्ध्वकमलामध्यें कलाध्वन्यास करावा. "ॐ हां शांत्यतीत-

ॐ हां शांतिकलायै नमः। २ विद्याकलायै नमः । प्रतिष्ठाकलायै नमः । निवृत्तिकलायै नमः ।। ५।। इति कलाध्वन्यासः।।

अथोर्ध्वपट्टिकायां तत्वाध्वन्यासः ।। ॐ हां शिवतत्त्वाय नमः। २ शक्तितत्वाय । २ सदाशिवतत्वाय । २ ईश्वर । २ शुद्धविद्या । २ काल । २ नियति । २ कला । २ विद्या । २ राग । २ पुरुष । २ प्रकृति। २ गुण । २ बुद्धि । अहंकार । २ चित्त । २ नेत्र । २ त्वक् । २ श्रोत्र । २ जिव्हा । २ घ्राण । २ वाक् । २ पाणि । २ पाद । २ पायु । २ उपस्थ । २ शब्द । २ स्पर्श । २ रूप । २ रस । २ गंध । २ आकाश । २ वायु । २ अग्नि । २ जल । २ पृथ्वीतत्वाय नमः । इति तत्वाध्वन्यासः ।। —

अथ तदाज्यप्रदारिके मंत्राध्वन्यासः ।। ॐ हां हृदया नमः । ॐ हां शिरसे स्वाहा । २ शिखायै वषट् । २ कवचाय हुं । २ नेत्र त्रयाय वौषट् । २ अस्त्राय फट् । ॐ हां सद्योजाताय नमः । ॐ हीं वामदेवाय नमः । ॐ हूं अघोराय नमः । ॐ हैं तत्पुरुषाय नमः । ॐ हः ईशानाय नमः।। ११।। इति मंत्राध्वन्यासः ।।

एवं लिंगे षडध्वन्यासान् कृत्वा तल्लिंगं गंधपुष्पादिभिः संपूज्य । अष्टत्रिंशत्कलान्यासं कुर्यात् । सांगुष्ठतर्जन्या लिंग स्पृशन् । " ईशानः सर्वविद्यानां नमः।" शशिन्यै नमः ऊर्ध्वमूर्घ्नि। "ईश्वरः सर्वभूतानां नमः" अंगदायै नमः। पूर्वमूर्घ्नि। "ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मा नमः।" इष्टदार्य नमः। दक्षिणमूर्घ्नि। शिवो मे अस्तु नमः।

कलायै नमः०"— इत्यादि इत्यादि — कलाध्वन्याय होय!

त्याचप्रमाणे ऊर्ध्व पट्टिकेंत तत्वाध्वन्यास करावा. "ॐ हां शिवतत्त्वाय नमः०" — इत्यादि इत्यादि तत्वाध्वन्यास होय!

त्याचप्रमाणें त्याच्या (आज्य प्रदारिकेंत) मंत्राध्वन्यास करावा. तो असा. "ॐ हां हृदया नमः"— इत्यादि इत्यादि — मंत्राध्वन्यास होय!

याप्रकारें लिंगाचे ठायीं सहा अध्वन्यास करून तें गंधपुष्पादिकांच्या योगें पूजावें. व नंतर ३८ कलान्यास करावा. अंगुष्ठ व तर्जनीच्या योगें

मरीच्यै नमः । वाममूर्ध्नि। सदाशिवों नमः । ज्वालिन्यै नमः । पश्चिममूर्ध्नि ।। अथ सांगुष्ठमध्यमया । "तत्पुरुषाय विद्महे नमः।" शांत्यै नमः। पूर्ववक्रे । "महादेवाय धीमहि नमः।" विद्यायै नमः । दक्षिणवक्रे । "तन्नो रुद्रो नमः । " प्रतिष्ठायै नमः । वामवक्रे । "प्रचोदयात् नमः।" ॐ निवृत्यै नमः । पश्चिमवक्रे । सांगुष्ठानामिकया । ॐ "अधोरेभ्योनमः" । तामस्यै नमः । हृदये । ॐ "अथ घोरेभ्ये नमः" । मोहायै नमः । कंठे ।। ॐ "घोर नमः" । जयायै नमः । दक्षिणांसे । ॐ "घोरतरेभ्यो नमः।" निद्रायै नमः । वामांसे । ॐ सर्वतः सर्व नमः । मृत्यवे नमः । नाभौ। सर्वेभ्यो नमः । मायायै नमः । जठरे । नमस्ते अस्तु नमः । अभयायै नमः । पृष्ठे । रुद्ररूपेभ्यः शिवेभ्यो नमः । जरायै नमः वक्षसि । सांगुष्ठकनिष्ठिकया । वामदेवाय नमः। विरजायै नमः । गुह्ये । ज्येष्ठाय नमः । रक्षायै नमः । लिंगे । ॐ श्रेष्ठाय नमो रत्यै नमः । दक्षिणोर्वोः । रुद्राय नमः पालिन्यै नमः । वामोर्वोः । कालाय नमः संज्ञायै नमः । दक्षिणजानुनि । कलनमः । कालायै नमः । वामजानुनि । विकरणाय नमः क्रियायै नमः दक्षिण जंघायां । बल नमः । बुद्ध्यै नमः । वामजंघायां । विकरणाय नमः । ज्ञानायै नमः । दक्षिणस्फिजि। बलाय नमः धात्र्यै नमः। वामस्फिजि । बलप्रमथनाय नमः भ्रामिण्यै नमः । कट्यां । सर्वभूतदमनाय नमः मोहिन्यै नमः । दक्षिणपार्श्वे । मनोन्मनाय नमः । अभयायै नमः । वामपार्श्वे । सर्वैरंगुलीभिः । सद्योजातं प्रपद्यामि नमः । सिद्ध्यै नमः । दक्षिणपादे । सद्योजाताय वै नमः । ऋध्द्यै नमः । वामपादे। भवे नमः । द्युत्यै नमः । दक्षिणकरे । अभवे नमः । लक्ष्म्यै नमः। वामकरे । नातिभवे नमः । मेधायै नमः । घ्राणे । भजस्व मां नमः। कांत्यै नमः। शिरसि। भव नमः । श्रद्धायै नमः । दक्षिणबाहो। उभ्दवाय नमः । धृत्यै नमः । वामबाहौ। इत्यष्टत्रिंशत्कलान्यासः।।

लिंगास स्पर्श करून, "ईशानः सर्व०"- इत्यादि इत्यादि — अष्टत्रिंशत् (३८) कलान्यास करावा.

अथ दीक्षा ।। परेद्युः यजमानः कृतनित्यक्रियः कृतमंगलस्नान-मलंकृतं कुमारं उक्तस्वस्तिवाचनकृतकौतुकबंधं आनीय प्राणानायम्य देशकालौ संकीर्त्य अस्य कुमारस्य दीक्षां कर्तुं तत्प्राच्यांगभूतं वापनादि करिष्ये इति संकल्प्य ।

उष्णेन वायु उदकेनेह्यदिति केशान् वपतु। उष्णाशीतास्वप आनीय । आप उंदंतु जीवसे दीर्घायुत्वाय वर्चसे । इति जलेन शिरः संसृज्य ।। त्रीन् दर्भान् पुरस्तादंतर्धाय । येनावपत्सविता क्षुरेण सोमस्य राज्ञो वरुणस्य विद्वान् । तेन ब्रह्मणो वपते दमस्यायुष्मान् जरदष्टिर्यथासत् । अयमसौ श्लोक्याय स्वस्तये यत्क्षुरेण मर्चयता सुपेशसा वप्ता वपसि केशान् । शुंधि शिरो मास्यायुः प्रमोषीः। इति पूर्वतः केशान् वापयित्वा। अप उपस्पृश्य तान् केशान् शकृत् पिंडे निधाय ततस्त्रीन् दर्भान् दक्षिणतोऽतर्धाय । येन पूषा बृहस्पतेरग्नेरिंद्रस्य चायुषे वपत् । तेनास्यायुषे वप । सौश्लोक्याय स्वस्तये । इति दक्षिणतः केशान् वापयित्वा। अपः उपस्पृश्य। ततस्त्रीन् दर्भान् पश्चादंतर्धाय । येन भूयश्चरात्ययं ज्योक्च

अथ दीक्षा – यजमानानें नित्य कर्मे आटोपून, मंगलस्नान केलेल्या, अलंकृत, व वर सांगितल्याप्रमाणें स्वस्तिवाचनादि करून कौतुक (कंकण) बांधलेल्या कुमारास आणून, प्राणायाम करून, देशकालादिकांचे संकीर्तन करून, “अस्य कुमारस्य०” इत्यादि संकल्प करावा. नंतर “उष्णेन वायु उदकेन०” इत्यादि मंत्रानें डोक्यास पाणी लावून तीन दर्भ पूर्वेस केसांवर ठेवून; काढावेत. व “येना वपत् सविता०” इत्यादि मंत्रांनी पूर्वेकडील केस काढावेत (वस्त्रानें) पाण्यास शिवून ते केस शेणाच्या गोळ्यांत ठेवावें. नंतर तीन दर्भ दक्षिणेस केसां-वर ठेवून काढावे नंतर; “येन पूषा०” इत्यादि मंत्रांनीं दक्षिणेकडचे केस काढा-वेत. पाण्यास शिवून,पुनः तीन दर्भ पश्चिमेस केसांवर ठेवून काढावेत “येन भूय-श्चरात्ययं०” इत्यादि मंत्रानीं पश्चिमेकडील केस काढावेत. पाण्यास शिवून पुनः

**पश्चातिसूर्यम् । तेनास्पायुषे वपसौ। श्लोक्याय स्वस्तये । इति केशान् वापयित्वा। अप उपस्पृश्य। ततस्त्रीन् दर्भानुत्तरतोंऽतर्धाय । येन पूषा बृहस्पतेरग्नेरिंद्रस्य चायुषे वपत् । तेन माहेश्वरशर्मन्नायुषा । वचसा यथा जोक्सुमना असाः । इत्युत्तरतः केशान् वापयित्वा । अपउपस्पृश्य । तान् केशान् शकृत्पिंडे निधाय । ततः कुमारस्य माता तदभावे वटुर्वा। उप्त्याव केशान् वरुणस्य राज्ञो बृहस्पतिः सवितासोमो अग्निः तेभ्यो निधानम् । बहुधान्वविंदन्नंतरा द्यावा पृथिवी अपस्वः । इत्युक्त्वा तान् केशान् उदुंबरमूले दर्भस्तंबे वा निदधाति। ततः सम्यक् स्नापयित्वा। अनंतरं सदस्यपूजां कृत्वा लब्धानुज्ञः माहेश्वरैः सह सामान्यार्घ्यहस्तो द्वाराणि अस्त्रेण संप्रोक्ष्य कवचेनावकुंठ्य । ॐ हां शांतिकलाद्वाराय नमः। इतिपूर्वे ।। ॐ हां विद्याकलाद्वाराय नमः । दक्षिणे ।। ॐ हां निवृत्तिकलाद्वाराय नमः । इति पश्चिमे।।२।। प्रतिष्ठाकलाद्वाराय नमः। इत्युत्तरे ।। इति संपूज्य ।। तच्छाखयोर्दक्षिणवामयोः पूर्वादारभ्य।। ॐ हां नंदिनें नमः ।। २।। महाकालाय नमः । दक्षिणे ।।२।। भृंगिने नमः ।। २।। विनायकाय नमः । पश्चिमे । ३ वृषभाय नमः । २ स्कंदाय नमः। उत्तरे । २ देव्ये नमः ।। २ चंडाय नमः । इति प्रतिव्दारं द्वौ द्वौ ध्यानपुरःसरं संपूज्य**
तीन दर्भ उत्तरेस केसांवर ठेवून काढावेत, "येन पूषा०" इत्यादि मंत्रांनीं उत्तरेकडील केस काढावेत. पाण्यास शिवून, ते सारे केस शेणांत ठेवावे. नंतर कुमाराची आई, अगर ती नसतां दुसरा एकादा बटु (ब्रह्मचारी), "उप्त्वाय केशान् ०" इत्यादि मंत्रांनीं जे केस उदुंबराच्या मुळीं, अगर दर्भ पुष्कळ वाढलेल्या ठिकाणीं, ठेवावेत. नंतर त्यास चांगला न्हावूं घालून, सदस्यांची (सभेतील लोक) पूजा करून त्यांचें अनुमोदन घेऊन ॐ हां शांतिकलाद्वाराय नमः" यानें पूर्वेस, ॐ हां विद्या०" इत्यादीनें दक्षिणेस, "ॐ हां निवृत्ति०" इत्यादीकेंकरून पश्चिमेस, व ॐ हां प्रतिष्ठा० इत्यादीनें उत्तरेस, —याप्रमाणें पूजा करावी. त्याच्या शाखेच्या उजव्या बाजूस, पूर्वेकडून सुरु करून, "ॐ हां नंदिने०" इत्यादीनें पूर्वेस "ॐ हां भृंगिने०" इत्यादीनें दक्षिणेस "ॐ हां वृषभाय०" इत्यादीनें पश्चिमेस "ॐ हां दैव्य०" इत्यादीनें उत्तरेस, — याप्रमाणें प्रतिद्वारी २-२ नंदी ध्यानपुरः सर, पूजावेत.

यजमानः दिव्यदृष्ट्या अवलोकनात् दिव्यान् विघ्नान् ॐ हः अस्त्राय फडिति पुष्पं क्षिप्त्वा अंतरिक्षगान् हुं फट् पाशुपतास्त्रेण दक्षिणपादपार्ष्णिघातैस्त्रिभिः भूमिष्ठान् त्रिविधान् विघ्नान् यागगृहादुद्वास्य सुगंधादिना धूपयित्वा लाजाचंदनसिद्धार्थभस्मपुष्पकुशाक्षतान्वा शुद्धलाजान्वा अस्त्राय फट् इति विकीर्य्य । मंगलतूर्यैर्दक्षिणपादपुरःसरं मंडपस्य पश्चिमद्वारेण किंचिद्वामशाखां समाश्रयन् अंतः प्रविश्य वेदिकायां कलशस्थापनस्य पश्चिमभागे किंचिद्दक्षिणभागमाश्रित्य प्राङ्मुखः सन् इष्टदेवतागुर्वादीन्नमस्कृत्वा चित्रासनादौ सपत्नीक उपविश्य मौहूर्तिकोक्ते शुभे मुहूर्ते कृतवापस्नापितं बद्धशिखं कुमारं मौहूर्तिकोक्ते शुभे मुहूर्ते स्वसमीपमानीय तन्मुखं सम्यगीक्षेत । स्वदक्षभागे शिशुमुपवेश्य त्रिगणान् श्वेतादीन् ध्यायेत् । तद्यथा । "वृषराजो महातेजा महामेघसमस्वनः । मेरुमंदरकैलास हिमाद्रिशिखरोपमः ।।" "सिताभ्रशिखराकारः ककुदा परिशोभितः । महाभोगींद्रकल्पेन बालेन च विराजितः" ।। रक्तास्यश्रृंगचरणो रक्त-

नंतर यजमानानें दिव्यदृष्टीने पाहून दिव्य विघ्नें असल्यास तीं –"ॐ हः अस्त्राय फट" ह्या मंत्रानें; अंतरिक्षांतील विघ्नें असल्यास ती हुं फट् पाशुपतास्त्रेण" हा मंत्र ह्मणून, उजव्या पायाच्या टांचेनें तीन वेळा भूमीवरमारून, भूमीवरचीं विघ्ने, – याप्रमाणें ही त्रिविध विघ्नें – यागाच्या (होमाच्या) गृहापासून दूर करून, सुगंध द्रव्यानें तें गृह धूपित करून; लाजा, चंदन, शुद्धार्थ (अक्षता), भस्म, पुष्पें, कुश व अक्षता - हीं; अगर शुद्ध लाजाच "अस्त्राय फट्" या मंत्रानें चोहोंकडे टाकाव्यात. मंगल वाद्यें वाजत असतां उजवा पाय पुढें ठेवून मंटपाच्या पश्चिमव्दारानें थोडें डावीकडे वळून आंत प्रवेश करून वेदिकेच्या ठायीं कलशस्थापनेच्या पश्चिमभागीं जरा उजवीकडे वळून पूर्वमुख होऊन इष्ट देवतांचे व गुरु वगैरेंचे मानसिक नमन करून चित्रविचित्र आसनावर पत्नीसह बसून ज्योतिष्यानें सांगितलल्या शुभ मुहूर्ती, क्षौर कर्म झाल्यानंतर स्नान घातलेल्या, व शेंडी बांधलेल्या कुमारास आपल्या जवळ आणवून त्याचें तोंड चांगलें निरीक्षण करावें. आपल्या उजव्या भागीं मुलास बसवून श्वेत आदि तीन गणांचें ध्यान करावें. तें असें:– "वृषराजो॰" इत्यादि (मूळांत पहावें).

प्रायविलोचनः । पीवरोन्नत सर्वांगःसुचारुगमनोज्ज्वलः ।।" प्रशस्तलक्षणः श्रीमान् प्रज्वलन् मणिभूषणः । शिवप्रियः शिवासक्तः शिवयोर्ध्वजवाहनः।।" "तथा तच्चरणन्यासप्रापितापरविग्रहः। गोराजपुरुषः श्रीमान् श्रीमच्छूलवरायुधः।।" तयोराज्ञां पुरस्कृत्य स मे कामं प्रयच्छतु ।। नंदीश्वरो महातेजा नगेंद्रतनयात्मजः। " स नारायणकैर्देवैर्नित्यमभ्यर्च्य वंदितः।। शर्वः शांतः पुरद्वारी सार्धं परिजनैः स्थितः ।" "सर्वेश्वरसमप्रख्यः सर्वासुरविमर्दनः।। सर्वेषां शिवधर्माणामध्यक्षत्वेऽभिषेचितः।" "शिवप्रियः शिवासक्तः श्रीमच्छूलवरायुधः ।। शिवाश्रितेषु संसक्तस्त्वनुरक्तस्तुतैरपि।" "सत्कृत्यशिवरोयाज्ञां स मे कामं प्रयच्छतु।। भृंगोशो नाम गणपः शिवारा-धनतत्परः ।" "प्रयच्छतु स मे कामं भर्तुराज्ञापुरःसरम् ।। वीरभद्रो महातेजा हिमकुंदेंदुसंनिभः" "भद्रकालीप्रियो नित्यं मातृणां चाभिरक्षकः ।। यज्ञस्य च शिरोहर्ता दक्षस्य च दुरात्मनः । " "उपेंद्रेंद्रयमादीनां देवानामंगतक्षकः ।। शिवस्यानुचरः श्रीमान् शिवशासनपालकः।" "शिवयोः शासनादेव स मे दिशतु वांच्छितं ।। श्वेतादिलकुशीशांतान् योगाचार्यमतानुगान् ।।" "सद्वादशोत्तरशतशिष्यसंख्यान् स्मराम्यहं ।।" इति शिवगणान् स्मृत्वा प्राणानायम्य देशकालावनुकीर्त्य।। एवंगुणविशिष्टायां शुभतिथौ अस्य कुमारस्य आणवादिमलत्रयापनोदनमायापाशविच्छेदनोभयपूर्वकशिवलिंगधारणयोग्यता-सिद्धिद्वारा द्विजत्वसिध्द्या वेदाध्ययनाधिकारार्थं एनं कुमारं वेधमनुक्रियात्मक-शिवदीक्षाख्यकर्मणा संस्करिष्ये इति संकल्प्य।।

अथ पंचकलशार्चनम् ।। गुरुः प्राणानायम्य। देशकालावनुकीर्त्य शिष्यस्य स्नपनार्थं ईशानादिपंचकलशस्थापनं करिष्ये इति । संक-

याप्रमाणें शिवगणाचें स्मरण करून, प्राणायामानंतर देशकालादिकांचे अनुकीर्तन करून, "एवंगुणविशिष्टायां०" इत्यादि संकल्प करावा.

**अथपंचकलशार्चनम्**।। गुरुनें प्राणायाम करून देशकालांचे अनुकीर्तन

ल्प्य।। मही द्यौः पृथिवीचन । इमं यज्ञं मिमिक्षितां। पिपृतान्नो भरीमभिः। इति भूमिं स्पृष्ट्वा जपेत् । ओषधयः संवदंते सोमेन सह राज्ञा । यस्मै कृणोति ब्राह्मणस्त राजन् पारयामसि इति प्रतिकलशं द्विप्रस्थधान्यं पद्मेषु दद्यात् ।। तदुपरि तदर्धतंडुलं तदुपरि तदर्धतिलं दद्यात् ।। तत्र ।। आकलशेषु धावति श्येनो वर्म विदाहते। अभिद्रोणा कनिक्रदत् । इति सौवर्णाद्यन्यतमकलशान्निदध्यात् । इमंमे गंगे यमुने सरस्वति शितुद्रिस्तोमं सचतापरूष्णिया । असि क्रिया मरुद्वृधे वितस्तयार्जी किये शुणुह्या सुषोमया। आपो वा इद सर्वं विश्वाभूतान्यापः । प्राणावा आपः । पशव आपः । सम्राडापो विराडापः । स्वराडापः । छंदा ष्यापः । ज्योती ष्यापः । यजू ष्यापः । सत्यमापः । सर्वा देवता आपः । भूर्भुवः सुवराप ॐ। इति मंत्राभ्यां तीर्थोदकमभिमंत्र्य ईशानादिसद्यांतमंत्रेण कलशेषु जलं पूरयेत् । "गंधद्वारा दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीम् ।। ईश्वरी सर्वभूतानां तामिहोपव्हये श्रियम् ।।" इति कलशेषु शिवाष्टगंधं निदध्यात् । कांडात्कांडात्प्ररोहंति पुरुषः पुरुषः परी। एवानों दूर्वे प्रतनु सहस्त्रेण शतेन च ।। इति पंचपल्लवपंचत्वग्दूर्वाश्च दद्यात् ।। स्योना पृथिवी भवानृक्षरानि

करून "शिष्यस्य स्नपनार्थ०" इत्यादि संकल्प करावा. "मही द्यौः पृथिवी०" इत्यादि मंत्र भूमीस स्पर्श करून जपावा. "ओषधयः संवदंते०" इत्यादि मंत्रानें प्रतिकलशांत दोन प्रस्थभर धान्य पद्मामध्यें घालावें. त्यावर तदर्ध तांदूळ, त्यावर तद्र्ध तिळ घालावे. नंतर "आकलशेषु०" इत्यादि मंत्रानें सोनें वगैरे कशाचेही कलश ठेवावेत. "इमंमेगंगे०" इत्यादि मंत्रांनीं तीर्थोदक अभिमंत्रून ईशान प्रारंभ करून सद्योजातपर्यंत मंत्रांनी प्रत्येक कलशीं पाणीं भरावें. "गंधद्वारा०" इत्यादिकांने कलशांमध्यें शिवाष्टगंध घालावा. "कांडात् कांडात्०" इत्यादिकांने पंचपल्लव व त्वग्दूर्वा कलशांमध्यें घालावेत. "स्योना पृथिवी०" इत्यादिकांने पंच पवित्र मृत्तिका घालाव्यात.

वेशिनी । यच्छानः शर्म सप्रथाः । इति पवित्रपंचमृत्तिकाः निक्षिपेत् ।। सहिरत्नानि दाशुषे सुवासि (ति) सविता भगः । तं भागं चित्रमीमहे। इति पंचरत्नानि निक्षिपेत् ।। हिरण्यरूपः सहिरण्यसंदृगपांनपात्से दुहिरण्यवर्णः। हिरण्ययात् परियोनेर्निषद्या हिरण्यदादत्यंनमस्मै। इति सुवर्णप्रतिमां दद्यात् । पूर्णादर्वि परापतेति फलं दद्यात् । युवासुवासाः परिवीत आगात्स उश्रेयान् भवति जायमानः । तं धीरा सः कवय उन्नयंति स्वाध्यो ३ मनसा देवयंतः । इति वस्त्रं दद्यात् ।। तंतु तन्वत् रजसो भानुमन्वहि । ज्योतिष्मतः पथो रक्षधिया कृतान् । अनुल्बणं पयसजो गुवा मपो जनुर्भव जनया दैव्यं जनम् । इति श्वेततंतुभिर्वेष्टयेत् । पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते प्रभुर्गात्राणि पर्येषि विश्वतः । अतप्ततनुर्नतदामोऽश्नुते। श्रितास हद्वहंतस्तत्समाशत। इति दर्भकूर्चं दद्यात्। याःफलिनीर्या अफला अपुष्पायाश्च पुष्पिणीः। बृहस्पतिप्रसूतास्तानो मुंचंत्व हसः । इति पूगपुष्पफलानि दद्यात् । इति पंचकलशानलंकृत्य तत्तत्कलशपूजार्थं ऋत्विजो वृणुयात्।।

आसनप्राणायामसंकल्पः।। एवंगुणविशिष्टायामस्यां शुभतिथौ अमुकगोत्रायामुकनाम्ने कुमाराय करिष्यमाणदीक्षाकर्मप्रयुक्त-पंचकलशपूजार्थ ऋत्विजो वरिष्ये ।। इति संकल्प्य ।। अथेशान

"सहिरत्नानि०" इत्यादिकांनें पांच रत्नें घालावींत. "हिरण्यरूपः०" इत्यादिकांने सुवर्णप्रतिमा घालावी. "पूर्णा दर्वि परा०" इत्यादिकानें फल घालावें. "युवा सुवासा०" इत्यादिकानें वस्त्र घालावें. "तंतु तन्वन्०" इत्यादिकांने श्वेततंतूंनीं वेष्टन करावें "पवित्रं ते०" इत्यादिकांनें दर्भकूच घालावे. "याः फलिनीर्या०" इत्यादिकाने पूगपुष्प व फळें घालावींत. याप्रकारें पंच कलश अलंकृत करून त्या त्या कलशाच्या पूजेस्तव ऋत्विजांचें आवाहन करावें. —

**"आसनाप्राणायाम संकल्पः"**—"एवंगुणविशिष्टायां०" इत्यादिक संकल्प करावा. " अथेशानकलशपूजार्थ० " इत्यादिकानें ऋत्विजास पूजून त्याच्या

कलशपूजार्थं ईशानमुखोभ्दूतं विश्वाराध्यं गुरं त्वां वृणीमहे ।। ॐ नमो भवगते आगमाध्ययनाय शुद्धनीलवर्णाय ईशानमुखोभ्दूताय मध्यमकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय अपरिमितभक्तगणाधीश्वराय चिन्मुद्रांकिताय अत्याश्रमाय षट्कृतिप्रणवजापकाय अपरिमितशिखाय नीलकंथाय बिल्वदंडाय कारुण्यमूर्तये नमः । इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन गुरुकलशपूजां कारयेत् ।।

अथ पूर्वस्यां दिशि सद्योजातकलशपूजार्थं सद्योजातमुखोभ्दूतं रेवणसिद्धं त्वां वृणीमहें। ॐ नमो भगवते रेणवसिद्धाय ऋग्वेदशाखाध्ययनाय हरिद्वर्णाय सद्योजातमुखोभ्दूताय पूर्वकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय द्वादशसहस्त्रचरलिंगाध्यक्षाय गुरुधर्मभिक्षां देहीति मुद्रांकिताय गृहस्थाश्रमाय शिवपंचाक्षरीजापकाय षट्त्रिंशज्जटामुकुटमंडिताय पीतकंथाय अश्वत्थदंडाय घनलिंगाय नमो नमः।। गंधाद्युपचारांस्तस्य कृत्वा तन्मुखेन सद्योजातकलशपूजां कारयेत् ।।

अथ दक्षिणदिशि वामदेवकलशपूजार्थं वामदेवमुखोभ्दूतं मरुळाराध्यमाचार्यं त्वां वृणीमहे ।। ॐ नमो भगवते मरुळाराध्याय यजुर्वेदायध्ययनाय श्वेतवर्णाय वामदेवमुखोभ्दूताय दक्षिणकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय असंख्यातचरलिंगाध्यक्षाय भवति भिक्षां देहीति मुद्रांकिताय ब्रह्मचर्याश्रमाय गायत्रीजापकाय पंचशिखाय श्वेतकंथाय पालाशदंडाय ब्रह्मचारिणे नमो नमः । इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन दक्षिणकलशपूजां कारयेत् ।।

अथ पश्चिमदिशि । अघोरकलशपूजार्थं अघोरमुखोभ्दूतम् एकोरामाराध्यं देवं त्वां वृणीमहे ।। ॐ नमो भगवते एकोरामाराध्यदेवाय सामवेदाध्ययनाय रक्तवर्णाय पश्चिममुखोभ्दूताय पश्चिमकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय त्रिसहस्त्रचरलिंगाध्यक्षाय लिंगार्पितभिक्षां देहीति मुद्रांकिताय वानप्रस्थाश्रमाय

**प्रणवमंत्रजापकाय एकशिखाय रक्तकंथाय न्यग्रोधदंडाय वानप्रस्थाश्रमाय नमो नमः।। इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन अघोरकलशपूजां कारयेत्।।**

**अथोत्तरदिशि ।। तत्पुरुषकलशपूजार्थं तत्पुरुषमुखोभ्दूतं पंडिताराध्यं त्वां वृणीमहे।। ॐ नमो भगवते पंडिताराध्याय अथर्वणशाखाध्ययनाय हरिद्वर्णाय तत्पुरुषमुखोभ्दूताय उत्तरकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय षट्सहस्त्रचरलिंगाध्यक्षाय दयाधर्मभिक्षां देहीति मुद्रांकिताय विरक्ताश्रमाय ॐ नमो हंसायेति जापकाय एकादशजटामुकुटमंडियात हरित्कंथाथ वेणुदंडाय विरक्ताश्रमाय नमो नमः।। इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन उत्तरदिक्कलशपूजां कारयेत् ।।**

**अथ कलशपूजा।। ईशानकलशपूजां करिष्ये।। तदंगत्वेन प्राणप्रतिष्ठापनं करिष्ये।। ईशानप्राणपतिष्ठापनमंत्रस्य ब्रह्मा ऋषिः। बृहती च्छंदः । ईशानो देवता। ईशान इति बीजं ईश्वरी इति शक्तिः । सदाशिवों इति कीलकम् । ईशानप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः । ईशानः सर्वविद्यानां अंगुष्ठाभ्यां नमः । ईश्वरः सर्वभूतानां तर्जनीभ्यां नमः । ब्रह्माधिपतिः मध्यमाभ्यां नमः । ब्रह्मणोऽधिपतिः अनामिकाभ्यां नमः । ब्रह्माशिवो मे अस्तु कनिष्ठिकाभ्यां नमः।**

मुखानें गुरुकलशपूजा करवावीं. "अथ पूर्वस्यां दिशि०" इत्यादिकांनें ऋत्विजास पुजूनत्याच्या मुखानें सद्योजातकलशपूजा करवावी. "अथ दक्षिणदिशि०" इत्यादिकानें ऋत्विजास पुजून त्याच्या मुखानें दक्षिणकलशपूजा करवावी. "अथ पश्चिमदिशि०" इत्यादिकांनें ऋत्विजास पुजून त्याच्या मुखानें पश्चिम कलशपूजा करवावी. "अथोत्तरदिशि०" इत्यादिकांनें ऋत्विजास पुजून त्याच्या मुखानें उत्तरदिक्कलशपूजा करवावी.

**अथ कलश पूजा।।** ईशानकलशपूजा करितों. त्याचेंच अंगभूत ह्मणून प्राणप्रतिष्ठापन करितों. "ईशानप्राण०" इत्यादिक मंत्रांनी सर्व उपचार मंत्रांत

सदाशिवों करतलकरपृष्ठाभ्यां नमः । ईशानः सर्वविद्यानां हृदयाय नमः। ईश्वरः सर्वभूतानां शिरसे स्वाहा। ब्रह्माधिपतिः शिखायै वषट् । ब्रह्मणोऽधिपतिः कवचाय हुं। ब्रह्मा शिवो मे अस्तु नेत्रत्रयाय वौषट् । सदाशिवों अस्त्राय फट् । ध्यानं ।। ईशानः सर्वविद्यानां ईश्वरः । सर्वभूतानां ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिब्रह्मा शिवोमे अस्तु सदाशिवों।। ईशानस्य प्राणा इह प्राणा ईशानस्य जीव इह स्थितः ।। ईशानस्य सर्वैंद्रियाणि कायवाडनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा। प्रसादलिंगाय नमः ।।श्रोत्रेंद्रियात्मने नमः । शरणस्थलस्वरूपाय नमः। शांत्यतीत कलात्मने नमः। शब्दग्रहणसाधनाय नमः। पराशक्त्यै नमः। शिवसादाख्यात्मने ईशानमूर्तये नमः। सान्निध्यं कुरु कुरु स्वाहा । सप्तमुद्राः प्रदर्श्य। सद्योजातं प्रपद्यामि इत्यासनं । सद्योजाताय वै नमः। इति प्राद्यम् ।। भवे भवे नातिभवे इत्यर्घ्यम् । भवोभ्दवाय नमः इत्याचमनीयम् । वामदेवाय नम इति स्नानं । ज्येष्ठाय नम इति वस्त्रं । श्रेष्ठाय नम इति उतरीयं । रुद्राय नम इति गंधं। कालाय नम इत्यक्षतान् । कलविकरणाय नम इति पुष्पं । बलविकरणाय नम इति धूपं । बलाय नम इति दीपं । बलप्रमथनाय नम इति काले नैवेद्यं । सर्वभूतदमनाय नम इति तांबूलं । मनोन्मनाय नम इति मंत्रपुष्पं । सर्वभूतदमनाय नम इति प्रदक्षिणाद्युपचारान् कृत्वा । मूलमष्टोत्तरशतं जपेत् ।।

अथ पूर्वदिशि सद्योजातकलशपूजां करिष्ये। तदंगत्वेन प्राणप्रतिष्ठां करिष्ये। सद्योजातप्राणप्रतिष्ठापनमंत्रस्य । ब्रह्माऋषिः। उष्णिक् छंदः। सद्योजातमूर्तिदेवता । सद्योजातमिति बीजं । प्रपद्यामिति शक्तिः । भवोभ्दव इति कीलकं । सद्योजातप्राणप्रतिष्ठार्थे सांगितल्याप्रमाणें करून मूलमंत्राचा १०८ वेळां जप करावा.

त्या प्रमाणेंच पूर्व दिशेस सद्योजात कलशपूजा करितों. तदंगभूत प्राण- प्रतिष्ठानही करितों. " यद्योजात प्राण० " इत्यादिकांनी पूर्ववत् सर्व उपचार

जपे विनियोगः । सद्योजातं अंगु०। प्रपद्यामि तर्ज०। सद्योजाताय वै नमो नमः मध्य०। भवे भवे अना०। नातिभवे भवस्वमां कनि०। भवोभ्दवाय नमः करतल०। सद्योजातं हृदयाय० । प्रपद्यामि शिरसे ० । सद्योजाताय वै नमो नमः शिखायै० । भवेभवे कवचाय०। नातिभवे भवस्वमां नेत्रत्रयाय०। भवोभ्दवाय नमः अस्त्राय ० । ॐ भूर्भुवस्वरोमिति दिग्बंधः । अथ ध्यानमंत्रः । सद्योजातं प्रपद्यामि सद्योजाताय वै नमो नमः। भवे भवे नातिभवे भवस्वमां भवोभ्दवाय नमः। सद्योजातस्य प्राणा इह प्राणाः सद्योजातस्य जीव इह स्थितः । सद्योजातस्य सर्वेंद्रियाणि कायवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा । आचारलिंगाय नमः। भक्तस्थलस्वरूपाय नमः। घ्राणेंदियात्मने नमः। निवृत्तिकलाय नमः। गंधग्रहणसाधनाय नमः। क्रियाशक्त्यात्मने नमः । कर्मसादाख्याय नमः। सद्योजातमूर्तये०। सान्निध्यं कुरु कुरु स्वाहा। सप्तमुद्राः प्रदर्श्य । पूर्ववदुपचारान् प्रकल्प्य । मूलमंत्रमष्टोत्तरशतं जपेत् ।।

अथ दक्षिणदिशि वामदेवकलशपूजां करिष्ये ।। तदंगत्वेन प्राणप्रतिष्ठापनं करिष्ये । अस्य श्रीवामदेवप्राणप्रतिष्ठापनमंत्रस्य। ब्रह्मा ऋषिः । शक्वरी छंदः । वामदेवो देवता । वामदेव इति बीजं । रुद्र इति शक्तिः । सर्वभूतदमनाय नम इति कीलकं। वामदेवप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः । वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमः। अंगु०। श्रेष्ठाय नमो रुद्राय नमः तर्ज०। कालाय नमः कलविकरणाय नमः मध्य०। बलविकरणाय नमो बलाय नमः अना०। बलप्रमथनाय नमः सर्वभूतदमनाय नमः कनिष्ठि०। मनोन्मनाय नमः करतल०। एवं हृदयादिन्यासः । ध्यानमंत्रः ।। वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमः श्रेष्ठाय नमो रुद्राय नमः कालाय नमः कलविकरणाय नमो करून मूळ मंत्राचा १०८ वेळां जप करावा.

त्याप्रमाणेंच दक्षिणदिशेस वामदेवकलशपूजा करितों. तदंगभूत प्राणप्रतिष्ठानही करितों. "अस्य श्रीवामदेव०" इत्यादिकांनीं पूर्ववत् सर्वोपचारांनीं

बलविकरणाय नमो बलाय नमो बलप्रमथनाय नमः सर्वभूतदमनाय नमो मनोन्मनाय नमः । वामदेवस्य प्राणा इह प्राणा वामदेवस्य जीव इह स्थितः । वामदेवस्य सर्वेंद्रियाणि कायवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा ।। गुरुलिंगाय नमः । जिव्हेंद्रियात्मने नमः । माहेश्वरस्थलस्वरूपाय नमः । प्रतिष्ठाकलाय नमः । रसग्रहणसाधनाय नमः । ज्ञानशक्त्यात्मने नमः । कर्तृसादाख्याय नमः । वामदेवाय० । सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा ।। अथ सप्तमुद्राप्रदर्शनपूर्वकं पूर्ववत् पूजां कारयेत् । मूलमंत्रमष्टोत्तरशतं जपेत् ।।

अथ पश्चिमदिशि अघोरकलशपूजां करिष्ये ।। तदंगत्वेन प्राणप्रतिष्ठानं करिष्ये । ॐ अस्य श्रीअघोरमंत्रस्य । ब्रह्मा ऋषिः । त्रिष्टुप् छंदः । अघोरेभ्य इति बीजं । सर्वेभ्य इति शक्तिः । रुद्ररूपेभ्य इति कीलकं । अघोरप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः । अघोरेभ्य अंगु० । अथ घोरेभ्यः तर्ज० । घोरघोरतरेभ्यः मध्य० । सर्वेभ्यः अना० । सर्वशर्वेभ्यः कनि० । नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः करतल० । एवं हृदयादिन्यासः । ध्यानमंत्रः ।। अघोरेभ्योथ घोरेभ्यो घोरघोरतरेभ्यः । सर्वेभ्यः सर्वशर्वेभ्यो नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः ।। अघोरस्य प्राणा इह प्राणा अघोरस्य जीव इह स्थितः । अघोरस्य सर्वेंद्रियाणि कायवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा । शिवलिंगाय नमः । नेत्रात्मने० । प्रसादस्थलस्वरूपाय० । विद्याकलायै० । रूपग्रहणसाधनाय० । मूर्तसादाख्याय० । अघोरमूर्तये० । इच्छाशक्तये० । सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा ।। सप्तमुद्राप्रदर्शनपूर्वकं पूर्ववदुपचारान् प्रकल्प्य मूलमंत्रमष्ठोत्तरशतं जपेत् ।।

करून मूळ मंत्राचा १०८ वेळां जप करावा.

त्याप्रमाणेंच पश्चिम दिशेस अघोरकलशपूजा करितों. तदंगभूत प्राणप्रतिष्ठानही करितों. "ॐअस्य श्रीअघोरमंत्रस्य ०" इत्यादिकांनी पूर्ववत् सर्वोपचा-

अथोत्तरदिशि तत्पुरुषपूजां करिष्ये ।। तदंगत्वेनप्राणप्रतिष्ठापनं करिष्ये ।। अस्य श्रीतत्पुरुषप्राणप्रतिष्ठापनमंत्रस्य । ब्रह्मा ऋषिः । गायत्रीच्छंदः । तत्पुरूषो देवता । तद्बीजं । महादेवायेति शक्तिः । रुद्र इति कीलकम् । तत्पुरुषप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः । तत्पुरुषायअंगु०। विद्महे तर्ज०। महादेवाय मध्य०। धीमहि अना० । तन्नो रुदः कनि०। प्रचोदयात् करतल०। एवं हृदयादिन्यासः ।। ध्यानं ।। तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि तन्नो रुद्रः प्रचोदयात् ।। तत्पुरुषस्य प्राणा इह प्राणा तत्पुरुषस्य जीव इह स्थितः। तत्पुरुषस्य सर्वेंद्रियाणि कायवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा। त्वगिंद्रियात्मने नमः। जंगमलिंगाय०। प्राणलिंगस्थलाय० । शांतिकलायै० आदिशक्त्यै० । स्पर्शविषयात्मने०। अमूर्तसादाख्याय० । तत्पुरुषब्रह्मणे०। सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा ।। सप्तमुद्राप्रदर्शनपूर्वकं पूर्ववदुपचारान् प्रकल्प्य मूलमंत्रमष्टोत्तरशतं जपेत् ।।--।। इति पंचकलशस्थापनविधिः।।

अनंतरं कलशस्थापनस्योत्तरभागे उपलेपनाद्यग्निप्रतिष्ठापनं कुर्यात्। तद्यथा। यजमानः प्राङ्मुखो वाग्यतो द्विराचम्य प्राणानायम्य देशकालौ संकीर्त्य अस्य कुमारस्य मलमायाविच्छेदपूर्वकतद्दीक्षाधिकारसिद्धिद्वारा श्रीपमरेश्वरप्रीत्यर्थं शिवदीक्षांगहोमं कर्तुं स्थंडिलादि करिष्ये इति संकल्प्य।।

रांनीं पूजा करून मूल मंत्राचा १०८ वेळां जप करावा.

त्याचप्रमाणें उत्तर दिशेस तत्पुरुषकलशपूजा करितों. तदंगभूत प्राणप्रतिष्ठापनही करितों. "अस्य श्रीतत्पुरुष." इत्यादिकांनीं पूर्ववत् सर्वोपचारांनीं पूजा करून मूळमंत्राचा १०८ वेळां जप करावा.— "इति पंचकलशस्थापनविधिः—"-

नंतर कलशस्थापनाच्या उत्तरभागीं उपलेपनानंतर अग्निप्रतिष्ठापन करावें. तें असें :— यजमानानें पूर्वमुख, व मौनी होऊन दोन वेळां आचमन करून प्राणायामानंतर देशकालादिकांचें संकीर्तन करून "अस्य कुमारस्य०" इत्यादि संकल्प करावा. गोमयानें सारविलेल्या शुद्ध प्रदेशांत, शुद्ध मातीने ईशान्येस प्रारंभ

अत्रिवन्नमसा गृणानः। अस्माकं बोद्धयविता तनूनां। यस्त्वाहृदा कीरिणा मन्यमानः। अमर्त्य मर्त्यो जोहवीमि। जातवेदो यशो अस्मासु धेहि। प्रजाभिरग्रे अमृतत्वमस्यां इति। अर्चयित्वा नत्वा च पुष्पादिभिरलंकृत्य नैवेद्यतांबूलं निवेद्य ब्रह्मणे यथोक्तदक्षिणाभावे हुतशेषं घृतादि सहिरण्यं दत्वा ब्रह्माभावे अन्यसौ माहेश्वराय दत्वा । पात्राणि प्रक्षाल्य पूर्वक्रमेण द्वंद्वशः उत्सृज्य ।।

"यस्य स्मृत्या च नामोक्त्या जपहोमक्रियादिषु ।। न्यूनं संपूर्णतां याति सद्यो वंदे सदाशिवम् ।।" "मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर।। यद्धुतं तु मया देव परिपूर्णं तदस्तु मे ।।" अनेन शिवदीक्षाहोमेन भगवान् सर्वात्मको यज्ञरूपी श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ।।

"गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ स्वस्थानं परमेश्वर ।। यत्र ब्रह्मादयो देवा-स्तत्र गच्छ हुताशन ।।" यज्ञेश्वराय नमः । यथास्थानं प्रतिष्ठापयामि ।। अनंतरं माहेश्वरभोजनपर्याप्तं तंडुलरूपां भिक्षां याचयेत् ।। तत्र क्रमः । भिक्षापात्रमादाय आदौ मातरं भवति भिक्षां देहि इति एवं मातुः-स्वसारं भगिनीं अन्यानपि बांधवान् प्रत्याख्यायिनः । प्रत्याख्यायिनीश्च याचयित्वा भिक्षामाचार्याय निवेद्य माध्यान्हिकशिवपूजां

स्थानीं होम करून राहिलेलें घृतादिक पदार्थ हिरण्यासह ठेवून, ते जंगम जवळ नसल्यास, इतर माहेश्वरांस द्यावेत. पात्रें (भांडीं) धुवून पूर्वक्रमाने २-२ सोडून द्यावींत.

"यस्वस्मृत्या०" इत्यादि मंत्रांनीं अनेन "शिवदीक्षाहोमेन०" इत्यादि ह्मणावें. नंतर "गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ०" इत्यादिक ह्मणावें.

नंतर माहेश्वरांचे पोट भरेल इतक्या तांदुळांची भिक्षा मागावी. ती अशी. भिक्षापात्र घेऊन प्रथम मातेकडे जावून "भवति! भिक्षां देहि" असें ह्मणावें. याप्रमाणे मावशीकडे वगैरे अन्य बांधवांकडेही भिक्षा मागावीं; नंतर ती भिक्षा आचार्याकडे नेऊन देऊन माध्यान्हकालच्या शिवपूजेला - लागावें.

कुर्यात् ।। ततः माहेश्वराशिषां ग्रहणं । सुवासिनीभिः नीराजनं । फलपूजादि कृत्वा माहेश्वरेभ्यो यथाशक्ति दक्षिणतांबूलादीन् दत्वा संतर्पणं कुर्यात् ।। श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ।। शुभं भूयात् ।।

अथ शिवदीक्षानंतरं वेदव्रतचतुष्टयनिर्णयः ।। तत्र वीरादीगोत्रजानां ऋगादिवेदिनां वेदचतुष्टयांरभो वर्तते। तत्र स्ववेदारंभं पूर्वं कृत्वा तदाहुतीर्हुत्वा ततोऽन्यवेदं पठेत् स्ववेदारंभमंतरा अन्यवेदारंभे दोषः । तथाच्च।। अधीत्य शाखामात्मीयामन्यशाखां ततः पठेत् ।। स्वशाखां यः पतित्यज्य शाखारंडः स उच्यते ।। इति शिवार्पणमस्तु ।।

## हर ॐ,, अथ वीरशैवविवाहविधिर्लिख्यते ।।

अथ विवाहांगभूतवाग्दानं । ज्योतिर्विदादिष्टे विवाहनक्षत्रादियुते

नंतर माहेश्वरांचा आशीर्वाद ग्रहण करावा. नंतर सुवासिनींनी नीराजन विधि करावा. फल वगैरेंनी पूजा (माहेश्वरांची) करून यथाशक्ति दक्षिणा तांबूलादिक देऊन त्यास संतुष्ट करावें.

।। श्रीसांबसदाशिवार्पणमस्तुं।।

शिवदीक्षेनंतर वेदव्रतचतुष्ट्यांचा निर्णय सांगतों. त्याविषयीं, वीरादि गात्रांत उत्पन्न झालेल्या ऋग्वेदि लोकांचा चारी वेद पठण करण्यास प्रारंभ होतो त्यांतही, प्रथम आपल्या वेदाचा आरंभ करून, त्याजविषयीं होम वगैरे करून नंतर इतर वेद त्यांनी पठण करण्यास सुरु करावेत. आपला वेद पठण करीत असतां मध्यंच सोडून देऊन इतर वेदांचें पठण सुरू केल्यास दोषप्राप्ति सांगितली आहे. त्याचप्रमाणे आपल्या शाखेचें आधी अध्ययन करून नंतर इतर शाखांचें अध्ययन करावें; आपली शाखा सोडून देऊन जो परशाखेचें अध्ययन करितो त्यास "शाखारंड" ह्मणतात.

।।इति श्रीशिवार्पणमस्तु।।

## अतां वीरशैवविवाह विधि सांगतात.

विवाहांगभूतवाग्दानविधि लिहितों. ज्योतिष्यांनीं सांगितलेल्या विवाह

**शुभे काले । द्वाभ्यां । चतुर्भिः । अष्टभिःप्रशस्तवेषधारिभिः । "अनृक्षरा ऋजवः संतुपंथा " इति उच्चरभ्द्रिर्माहेश्वरैः । तावतीभिः पुरंध्रीभिर्मगलतीतूर्यैश्च सह शकुनदर्शनपूर्वकमलंकृतवरयुता वा । तदयुता वा । कन्यागृहमेत्य वरेण तत्पित्रादिनापि प्रार्थिताः बांधवाः सदसि भद्रासने प्राङ्मुखी सालंकारां सुवेषां कन्यामुपवेश्य । तद्धस्ते फलतांबूलादीनि दत्वा । श्रीसांबसदाशिव-स्मरणपूर्वकं । प्राङ्मुखासीनाः । प्रत्यङ्मुखा वा । अमुकप्रवरान्वितगोत्रोत्पन्नाय। अमुकप्रपौत्राय । अमुकपौत्राय । अमुकपुत्राय । अमुकनाम्ने वराय । अमुकगोत्रोत्पन्नां । अमुकप्रपौत्रीं । अमुकपौत्रीं। अमुकपुत्रीं। अमुकनाम्नी कन्यां। भार्यात्वाय वृणीमहे।। इति ब्रूयुः ।। अथ दाता । भार्याज्ञातिबंध्व-नुमतिं कृत्वा । यथोक्तमनूद्याननूद्य वा वृणीध्वमिति वदेत् । एवं पुनः द्विः प्रयोज्य ।। प्रदास्यामीति त्रिश्चोच्चैर्वदेत् । ततो वरपित्रादिर्गंधाक्षतवस्त्रभू-षणपुष्पादिभिः कन्यामलंकुर्यात् । अथ दाता स्वयं उदङ्मुखः प्राङ्मुखं वरं पूजयित्वा आचम्य पूर्वाभि-**

नक्षत्रादियुक्त शुभकाळी, २-४ अगर ८-सभ्य वेषधारण केलेल्या, "अनृक्षरा." इत्यादिकांचा उच्चार करीत असलेल्या, माहेश्वरांसह; व तितक्याच पुत्रवती स्त्रियांसह; मंगल वाद्यें वाजवीत, शकुन वगैरे पाहून, अलंकृत वरास बरोबर घेऊन अगर न घेऊन, —कन्येच्या घरीं जावें. वरानें व त्याच्या पित्यानें प्रार्थना केल्यावरून बांधवांनी, त्या सभेंत उत्तम आसनावर पूर्वमुख करून त्या अलंकारयुक्त, व सुवेषयुक्त कन्येस बसवून; तिच्या हाती फलतांबूलादि घेऊन; श्रीसांबसदाशिवाचें स्मरण करून; पूर्व अगर उत्तर मुख बसून; "अमुक प्रवरान्वित०" इत्यादि इत्यादि "अमुकनाम्नीं कन्यां भार्यात्वाय वृणीमहे०" — असें 'वरपक्षांकडील लोक' ह्मणतात. नंतर दात्यानें, भार्या, ज्ञाति, बांधव वगैरेंची अनुमति घेऊन, "विधिवत् हिला निर्दोष अशी पाहून "वृणीध्वम्" ह्मणजे निवडा असें ह्मणावें. याप्रमाणें दोन वेळां करावें, "प्रदास्यामि," "देतों" असें दात्यांनी तीन वेळा मोठ्याने ओरडून ह्मणावें. नंतर वर व त्याचा पिता इत्यादिकांनी, गंध, अक्षता, वस्त्र, भूषण, पुष्प, आदिकरून कन्येला अलंकृत करावें. दात्यानें स्वतः अगर उत्तर अगर पूर्वमुख

मुखः सन् । कन्यां वामत उपवेश्य पत्न्या सह देशकालौ स्मृत्वा । करिष्यमाणविवाहांगभूतवाग्दानमहं करिष्ये इति संकल्प्य।। कलशपूजादिमाहेश्वरपूजनांतं यथाचारं कृत्वा । स्वस्थाने गृहीतारमुपवेश्य ।। स्वयं तत्पुरतः उदङ्मुख उपविश्य । गंधतांबूलादिना पूजयित्वा ।। स च दातारं । ततो दाता आचारतः पंच हरिद्राखंडानि पंच पूगफलानि गंधाक्षतालंकृतानि गृहीत्वा ।। अमुकप्रवरान्वितगोत्रोत्पन्नाय । १ प्रपौत्राय । १ पौत्राय । १ पुत्राय । १ नाम्ने वराय । अमुकप्रवरान्वितगोत्रोत्पन्नां । १ प्रपौत्रीं । १ पौत्रीं । १ पुत्रीं । १ नाम्नीमिमां कन्यां । ज्योतिर्विदादिष्टे सुमूहूर्ते वाचा संमददे इति चोक्त्वा । "अव्यंगेऽपतितेऽक्लीबे दशदोषविवर्जिते । इमां कन्यां प्रदास्यामि भक्तमाहेशसंनिधौ ।। इति प्रतिगृहीतृवस्त्रप्रांते तानि पूगफलानि पंच हरिद्राखंडानि प्रक्षिप्य । "प्रतिष्टेस्थो देवतानां मामा संताप्तं" इति मंत्रेण। तथास्त्वित्यादिना बद्ध्वा। ग्रंथिं गंधादिभिरभ्यर्चयेदित्याचारप्राप्तं ततः प्रतिगृहीताऽपि पंच पूगफलानि पंच हरिद्राखंडानि । अमुकगोत्रोत्पन्नवरविषये भवंतो निश्चिता भवंत्विति दातृवस्त्रप्रांते प्रक्षेपादि कुर्यात् ।।

बसलेल्या वराची पूजा करून, आचमानानंतर पूर्वाभिमुख होऊन; कन्येस डाव्या बाजूस बसवून, पत्नीसह देशकालादिकांचे स्मरण करून, "करिष्यमाण०" इत्यादि संकल्प करावा. नंतर कलशपूजेपासून माहेश्वरपूजेपर्यंत यथासांग सर्व कांही करावें. प्रतिगृहीत्यास आपल्या स्थानीं बसवून, स्वतः त्यापुढें उत्तरमुख बसून, त्यास गंधतांबूलादिकेंकरून पुजून, आणि त्यानें त्याचप्रमाणे दात्यासही उलट पुजून; नंतर आचाराप्रमाणें दात्यानें हातीं, ५ हळकुंड, ५ सुपा-या, गंध अक्षता व अलंकार घेऊन; "अमुकप्रवरान्वित०" इत्यादि० इत्यादि — (मूळांत दिल्याप्रमाणे) ह्मणून; व "अव्यंगेऽपतित०" इत्यादिकही नंतर ह्मणून प्रतिगृहीत्याच्या वस्त्राच्या पदरांत त्या सुपा-या व ते हळकुंठ घालून, "प्रतिष्ठे०" इत्यादि मंत्रानें - व "तथास्त्वि-- " त्यादिकांनें, — गांठ बांधून; ती (गांठ) गंधादिकांनी पूजावी, असा आचार आहे. नंतर प्रतिगृहीत्यानें देखील "अमुकगोत्रोत्पन्न०" इत्यादि (मूळांत असल्याप्रमाणे) ह्मणून

ततो दाता । "वाचा दत्ता मया कन्या पुत्रार्थं स्वीकृता त्वया।। कन्यावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव।।" इति वरपितरं प्रति वदेत्।। स च । "वाचा दत्ता त्वया कन्या पुत्रार्थं स्वीकृता मया ।। वरावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव ।। इति दातारं प्रति वदेत् । भ्रात्रादौ स्वीकर्तरि । भात्रर्थं शिष्यार्थं इत्यूहः कार्यः ।। ततो माहेश्वराः । शिवा आपः संतु। सौमनस्यमस्तु । अक्षतं चारिष्टं चास्तु दीर्घमायुः शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु। एतद्वचः सत्यमस्त्वित्युक्त्वा। समानीव आकूतिः समाना हृदयानि वः । समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ।। प्रसुग्मंताधियसा नस्य सक्षिणि वरेभिर्वराम् । अभिषु प्रसीदत ।। अस्माकमिंद्र उभयं जुजोषति । यत्सोम्यस्यांधयो बुबोधति ।। हिंकृण्वती वसुपत्नी बसूनां। वत्समिच्छंती मनसाभ्यागात् । दुहामश्विभ्यां । पयो अघ्न्योयं सावर्धतां । महते सौभगाय। ततो दाता पात्रस्थतिततंडुलपुंजे गौरीमावाह्य। षोडशोपचारैः पूजयेत् ।" "कात्यायनि नमस्तुभ्यं शंकरप्रिपभामिनि । विवाहभाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे ।। इति कन्या गौरीं प्रार्थयेत् ।। ततः पुरंध्रीभिः नीराजनादि मांगलिकं कार्यं । माहेश्वराय गंधतांबूलादिना पूजिताः ।। आशीर्मंत्रान् पठेयुः ।। ते च हिंकृण्वतीति ऋक् ।। समिद्धस्य श्रयमाणः पुरस्ताद्‌ब्रह्म वस्वानो अचरं

दात्याच्या वस्त्राच्या पदरांत हळकुंड वगैरे बांधावेत. नंतर दात्यानें –"वाचादत्ता" इत्यादिक वराच्या पित्याप्रत ह्मणावें व त्यानें (वरपित्यानें) ही "वाचादत्तात्वया०" इत्यादिक दात्याप्रत ह्मणावें. (भाऊ वगैरे स्वीकार करणारे असल्यास "भ्रात्रर्थ०" वगैरे ह्मणावे.) नंतर माहेश्वरांनी "शिवा आपः संतु०" इत्यादि ह्मणून, "समानीव आकूतिः०" इत्यादि (वेदोक्त) मंत्र ह्मणावेत नंतर दात्यानं पात्रामधील तांदुळाच्या गुप्यांवर गौरीचें आवाहन करून; "कात्यायनि०" इत्यादिकांने कन्येकडून गौरीची प्रार्थना करवावीं. नंतर पुत्रवती स्त्रियांनी नीराजनादि विधि करावेत. माहेश्वरांनींही, गंध तांबूलादिकरून

सुवीराः। आरे अस्मादमतिं बाधमान उच्छ्रयस्व महते सौभगाय ।। वनस्पते शतवलुशो विरोहसहस्त्र बलुशाविव य रूहेम।। यं त्वामयं स्वधितिस्तेजमानः प्रणिनाय महते सौभगाय । इंदुर्देवानामुपसक्यमायन् । सहस्त्रधारः पवते मदाय ।। अभिस्तवावो अनुधाय पूर्वमगमिंद्रं महते सौभगाय । घृतादुर्लुप्तं ऋक् ।।१।। तदस्तु मित्रावरुणा ऋक् ।।२।। गृहा वै प्रतिष्ठासूक्तं तत्प्रतिष्ठिततमया वाचाशंस्तव्यं तस्माद्यद्यपि दूरइव पशून् लभते गृहा मे वै नानाजिगमिषति ग्रहा हि पशूनां प्रतिष्ठापयतीति वाग्दानविधिः।।

ततो वैवाहिके शुभे मुहूर्ते ।। वधूवरयोस्तैलहरिद्रारोपणादि यथाचारं कार्यं । अथ विवाहपूर्वदिनकर्तव्यं ।। वधूपिता वरपिता च विवाहदिनात् पूर्वेद्युः ।। पूर्वाह्ने सपत्नीकः कृताभ्यंगो धृतमांगलिकवेषः कृतनित्यक्रियः मंगलसंभारं संभृत्य कृतलेपनरंगमालिके प्रांगणे शुभासने ।। प्राङ्मुख उपविश्य। स्वस्य दक्षिणतः पत्नीं तद्दक्षिणतः कन्यां वरं चोपवेश्य।। आचम्य। इष्टदेवतागुर्वादीन् नमस्कृत्वा। प्राणानायम्य । देशकालौ संकीर्त्य । अमुकशर्मणः पुत्रस्य कन्यायाः श्वः करिष्यमाणविवाहांगभूतस्वस्तिवाचनांकु- रारोपणनांदीसमाराधनमंडपदेवताप्रतिष्ठाकुलदेवताप्रार्थनं च करिष्ये आर-

पूजित होत्साते' आशीर्वादमंत्र ह्मणावेत. ते-हे-"समिद्ध०" इत्यादि इत्यादि (मूळांत पहावें) ।। इत्यादि वाग्दानविधिः।।

नंतर विवाहाच्या शुभमुहूर्तीं वधू व वर या दोघांसही तेल व हळद आचाराप्रमाणें लावावीं. विवाहाच्या पूर्वीच्या दिवसाचे कर्तव्य वधूपिता व वरपिता हे पूर्वीच्या दिवशी पूर्वान्ही सपत्नीक होऊन अभ्यंगस्नान करून, मंगलवेषधारण करून, नित्य कर्मे वगैरे सर्व आटोपून, मंगल द्रव्यें व वस्त्रें धारण करून; सारवून रांगोळी वगैरे घालून अलंकृत केलेल्या आंगणांत शुभासनावर पूर्वमुख बसून, आपापल्या उजव्या बाजूस, पत्नीस, व वर व वधूस बसवून; आचमन करून; इष्टदेवता गुरु वगैरेचें स्मरण करून; प्राणायामानंतर देशकाला-

**ब्धस्य कर्मणः निर्विघ्नेन परिसमाप्तर्थे आदौ श्रीसिद्धिविनायकपूजां करिष्ये इति संकल्प्य।।**

**गणानां त्वा गणपति हवामहें कविं कवीनामुपमः श्रवस्तभं। ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आनः शृण्वन्नूतिभिः सीदसादनम् ।। इत्याबाह्य। भूः गणपतिमावाह्यामि। भुवः गणपतिमावाह्यामि । स्वः गणपतिमावाहयामि। इत्यावाह्य नवशक्तिपूजां करिष्ये।। तीव्रायै नमः । ज्वालिन्यै नमः । नंदायै०। भोगदायिन्यै०। कामरूपिण्यै०। उग्रायै०। तेजोवल्ये०। सत्यायै०। विघ्ननाशिन्यै०। ॐ नमो भगवते सकलगुणात्मकशक्तियुताय महागणाधीश्वराय योगपद्मपीठात्मने नमः सुवर्णपीठं कल्पयामि। "स्वात्मसंस्थमजं शुद्धं त्वामद्य गणनायक। अरणाविव हव्याशमूर्तिमावाहयाम्यहं ।। ॐभूर्भुवःस्वरों सशक्तिसांगसायुधसवाहन सपरिवारमहागणाधीश्वर अत्रागच्छागच्छ। आवाहयामि आवाहितो भव । स्थापयामि। स्थापितो भव । संनिहितोभव। अवकुंठितो भव । व्याप्तो भव। वरदो भव। इति षण्मुद्राः प्रदर्श्य।। एकदंताय विद्महे । वक्रतुंडाय धीमहि। तन्नो विघ्नेश्वरः प्रचोदयात् ।। गां हृदयात नमः। गीं शिरसे स्वाहा। गूं शिखायै वषट् । गैं कवचाय हुं। गौं नेत्रत्रयाय घोषट् । गः अस्त्राय फट् । ॐ भूर्भवःस्वरोमिति दिग्बंधः । ध्यानं ।। "रक्तो रक्तांगरागः शुककुसुभयुतस्तुंदिलश्चंद्रमौलिर्नेत्रैयुक्त-स्त्रिभिर्वामनकरचरणो बीजपूरात्तवासाः ।। इस्ताग्रक्लप्तपाशांकुशरदवरदो**

दिकांचें संकीर्तन करून; "अमुकशर्मणः पुत्रस्य०" इत्यादिक - संकल्प करावा. "गणानांत्वा०" इत्यादि वेदमंत्राने सिद्धिविनायकाचें आवाहन करून, "भूः गणपतिं०" इत्यादिकानीही आवाहन करावें. नंतर नवशक्तिपूजा करावी. "तीव्रायै नमः०" इत्यादिकांनीही आवाहन करावें. नंतर नवशक्तिपूजा करावी. "तीव्रायै नमः०" इत्यादिकांनी ती करावी. नंतर "ॐ नमो भगवते०" इत्यादि आवाहनादि करून, नंतर करन्यास व हृदयादिन्यासही करून, मग "ॐ भूर्भुवःस्वरों" यानें दिग्बंध करावा. नंतर "रक्तो रक्तांर०" इत्यादि ध्यान करावें. नंतर

नागवक्रोऽहिभूषो देवः पद्मासनस्थो भवतु नतसुखो भूतये विघ्नराजः"।।
गं गणपतये नमः इति जपं कृत्वा द्वादशनामपूजां करिष्ये ।। सुमुखाय नमः। एकदंताय० कपिलाय०। गजकर्णकाय०। लंबोदराय०। विकटाय०। विघ्नराजाय०। गणाधिपाय०। भालचंद्राय०। गजाननाय०। धूमकेतवे०। सिद्धिविनायकमूर्तये०। इति पुष्पाणि समर्पयामि । धूपमाघ्रापयामि । दीपं दर्शयामि। नैवेद्यं समर्पयामि। तांबूलं समर्पयामि। सुवर्णपुष्पं समर्पयामि। निषुसीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कवीनाम् । न ऋते त्वक्रियते किंचनारे महामर्कं मघवं चित्रमर्च इति मंत्रपुष्पं समर्पयामि।। "वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ। निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा" "सस्य स्मृत्या च नामोक्त्या तपोदीक्षाक्रियादिषु ।। न्यूनं संपूर्णतां याति सद्यो वंदे सदाशिवम्।।" इति गणपतिपूजनेन श्रीभगवान् सदाशिवः प्रीतो भवतु।।

रंगवलयादियुक्ते भूतले। मही द्यौः पृथिवी च न । इमं यज्ञं मिमिक्षतां । पिपृतान्नो-भरीमभिः। इति दक्षिणोत्तरतो भूमिं स्पृष्टा जपेत् । ओषधयः संवदंते । सोमेन सह राज्ञा । यस्मै करोति ब्राह्मणस्त राजन्पारयामसि। इति तंडुलपुंजौ दक्षिणोत्तरतः कृत्वा। आकलशेषु धावति। पवित्रेषु परिषिच्यते। उक्थैर्यज्ञेषु वर्धते। इति पुंजोपरि धातुमयौ मृण्मयौ वा कलशौ निधाय। इमं मे गंगे यमुने सरस्वति शितुद्रि-

"गं गणपतये नमः" याचा जप करावा; व १२ नांवांची पूजा करावी. "सुमुखाय नमः०" इत्यादि० याप्रमाणें गणपतिपूजन करून "इति गणपतिपूजन०" इत्यादि विधीप्रमाणे ह्मणावें – असों. रांगोळीनें अलंकृत भूमीवर, "महीद्यो:०" इत्यादिक मंत्र, दक्षिणेस व उत्तरेस भूमीस स्पर्श करून, जपावेत. "ओषधयः०" इत्यादिकांने दक्षिणेस १ व उत्तरेस १ याप्रमाणें २ राशीं तांदुळांच्या करून; "आकलशेषु०' इत्यादिकांनी त्या राशींवर धातूचे अगर मातीचे दोन कलश ठेवावेत. "इमं मे गंगे०" इत्यादिकांनी तीर्थजलानें ते कलश भरावेत.

स्तोम सचता परुष्णिता ।। असिक्रिया मरुद्धधे वितस्तयार्जीकिये शृणुह्या सुषोमया इति तीर्थजलेन प्रत्येकं पूरयित्वा।। "गंधद्वारां दुराधर्षा नित्यपुष्टां करीषिणीं। ईश्वरीं सर्वभूतानां तामिहोपह्वये श्रियम्।।" इति गंधं कलशयोर्दद्यात् ।। चंदनादिना तावनुलिप्य।। मालाभूषितौ कृत्वा । स हि रत्नानि दाशुषे सुवाति सविता भगः । तं भागं चित्रमीमहे । इति पंच रत्नानि निक्षिप्य । प्रसवो यज्ञेषु देवयंतो अर्चद्यावान होभिः । पृथिवि इषद्यै एषां ब्रह्मान्यसमानि विप्रा विषवग्वियंति वनिनो न शाखाः । इति आम्रपल्लवानि निक्षिप्य। हिरण्यवर्णः सहिरण्यसंद्रगपांनपात्सेदुहिरण्यवर्णः।। हिरण्ययात् परियोनेर्निषद्या हिरण्यं दादत्यं नमस्मै इति हिरण्यं दद्यात् ।। पूर्णादर्वीपरापत सुपूर्णा पुनरापता । वस्नेव विक्रीणावह इषमूर्ज शतक्रतो इति। याः फलिनीर्या अफला अपुष्या याश्च पुष्पिणीः। बृहस्पतिप्रसूतास्ता नो मुंचत्व हसः । इति च कलशयोरुपरि नारिकेलफले निक्षिप्य । युवासुवासाः परिवीत आगात् सउश्रेयान् भवति जायमानः । तं धीरा सः कवय उन्नयंति ।। स्वाध्यो मनसा देवयंतः । इति कलशयोरुपरि वस्त्रो निदध्यात् ।। तत्वायामि शुनः शेपो वरुणस्त्रिष्टुप् । उत्तरकलशे वरुणावाहने विनियोगः । तत्वायामि ब्रह्मणा वंदमानस्तदाशास्तेयजमानो हविर्भिः ।। अहेडमानो वरुणेह बोध्युरुश समान आयुः प्रमोषीः । इत्यावाह्य । कलशस्य

"गंधद्वारां०" इत्यादिकानें त्यांत गंध घालावें. चंदनानें अनुलेपन करून, व माळा घालून, "सहिरत्नानि०" इत्यादिकांनी पांच रत्न त्यांत टाकून, "प्रवो यज्ञेषु" इत्यादिकांनी त्यांत आंब्यांचीं पानें घालावींत "हिरण्यवर्णः" इत्यादिकांनी नंतर त्यांत हिरण्य टाकावं. "पूर्णा दर्वीपरा"– इत्यादिकांनी कलशांवर नारळ ठेवून, "युवासुवासाः" इत्यादिकांनी ते कलश वस्त्रित करावेत. नंतर "तत्त्वायामि०" इत्यादिकांने उत्तर कलशांत वरुणाचें आवाहन करुन, "कलशस्यमुखे०" इत्या-

मुखे रुद्रः कंठे विष्णुः समाश्रितः । मूले तत्र स्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणाः स्मृताः ।। कुक्षौ तु सागराः सर्वे तीर्थानि तु ह्रदा नदाः ।। गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वति। नर्मदे सिंधुकावेरि जलेऽस्मिन् संनिधिं कुरु।।" इति कलशौ स्पृष्टा जपेत् पूजां कृत्वा अक्षतांश्च निक्षिपेत् ।। मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव। अतिथीदेवो भव। भवनिकृतजानुमंडलः कमलमुकुलसदृशमंजलिं शिरसि कृत्वा । उमामहेश्वराभ्यां प्रमथगणेभ्यो। भक्तमाहेश्वरेभ्यौ नमः। इति नमस्कारं कृत्वा । ततः कर्ता दक्षिणेन पाणिना उत्तरकलशं बिभ्रन् आप इत्युक्त्वा। शिवा आपः संतु इति माहेश्वरान् वाचयित्वा। गंधा इत्युक्त्वा सुगंधाः पांत्विति वाचयित्वा । सुमनस इत्युक्त्वा । सौमनस्यमस्त्विति वाचयित्वा । तांबूलानि पांतु । ऐश्वर्यमस्तु । दक्षिणाः पांतु । बहुधेयं चास्तु। दीर्घमायुः। शांतिः पुष्टिस्तुष्टिश्वास्तु। शुभाः शोभनाः प्रवर्तताम् । तमहमोंकारमार्दि कृत्वा । ऋग्यजुःसामाशीर्वचनं बहुऋपिसंमतं। संविज्ञातं भवभ्दिरनुज्ञातः। पुण्यं पुण्याहं वाचयिष्ये। वाच्यतामिति वदेयुः। भद्रं कर्णेभिःशृणुयाम देवाः। भद्रं पश्येमाक्षिभिर्यजत्राः । स्थिरैरंगैस्तुष्टुवा सस्तनूभिः। व्यशेम देवहितं ह्यदायुः।। द्रविणोदा द्रविण सस्तुरस्य । द्रविणो दासनरस्य प्रियं सत् । द्रविणोदावीरवती । विषण्णो द्रविणो दारासते

दिकांचा जप, कलशास स्पर्श करून, करावा. नंतर पूजा करून अक्षता घालाव्यात. "मातृदेवो भव०" इत्यादिके करून भुईवर गुडघे टेकून कमळाच्या पाकोळी प्रमाणें अंजुळी डोक्यावर करून, "उमामहेश्वराभ्यां०" इत्यादिके करून नमस्कार करावा. नंतर कर्त्यानें उजव्या हातानें उत्तरेकडील कलश घेऊन, "आपः" असे ह्मणावें. "शिवा आपः संतु" असें माहेश्वरांकडून वदवावे. "गंधाः" असें ह्मणून 'सुगंधाः पांतु' असें वदवावें. "सुमनस" असें ह्मणून, "सौमन्यमन्तु" असें वदवावें. "तांबुलानि पांतु०" इत्यादि ह्मणून, "पुण्यं पुण्याहं वाचयिष्ये" असें ह्मणावें. "वाच्यताम्" असें ते ह्मणतील० "भद्रं कर्णेभिः०" इत्यादि वेदमंत्र

दीर्घमायुः । सविता पश्चातातसविता पुरस्तात्सवितोत्तरात्तात्सविताधरात्ता-त्सवितानः संतु सर्वं रातिं सविता नो रासतां दीर्घमायुः ।। आप उंदंतु जीवसे दीर्घायुत्वाय वर्चसे । यस्त्वा हदा कीरिणा मन्यमानो मर्त्यं मर्त्यो जोहवीमि। जातवेदो यशो अस्मासु धेहि प्रजाभिरग्रेरमृतत्वमस्याम् । यस्मै त्व सुकृते जातवेद उलोकमग्ने कृणवस्योनं । आश्विन स पुत्रिणं वीरवंतं गोमंत रयन्न शते स्वस्ति । संत्वा सिंचामि यजुषा प्रजामायुर्धनं च । दीर्घमयुरस्तु मनः समाधीयतां। समाहितमनसः स्मः । प्रसीदंतुभवंतः । प्रसन्नाः स्मः।। शांतिरस्तु। पुष्टिरस्तु। तुष्टिरस्तु। वृद्धिरस्तु। अविघ्नमस्तु। आयुष्यमस्तु। आरोग्यमस्तु। स्वस्त्यस्तु। शिवं कर्मास्तु। कर्मसमृद्धिरस्तु। शास्त्रसमृद्धिरस्तु। वेदसमृद्धिरस्तु। पुत्रसमृद्धिरस्तु। धनधान्यसमृद्धिरस्तु। इष्टसंपदस्तु। अरिष्टनिरसनमस्तु। यत्पापं तत्प्रतिहतमस्तु। यच्छ्रेयस्तदस्तु।।

उत्तरे कर्मण्यविघ्नमस्तु। उत्तरोत्तरमहरहरभिवृद्धिरस्तु। उत्तरोत्तराः क्रियाः शुभाः शोभनाः प्रवर्तन्त्तां।। तिथिकरणमुहूर्तनक्षत्रसंपदस्तु।। माहेश्वरीपुरोगा मातरः प्रीयंताम् । भगवती कात्यायनी प्रीयताम् । भगवती माहेश्वरी प्रीयतां भगवती पुष्टिकरी प्रीयताम् । भगवती तुष्टिकरी प्रीयतां। भगवती ऋद्धिकरी प्रीयतां। भगवती वृद्धिकरी प्रीयतां। हताः परिपंथिनौ। हता अस्य कर्मणो विघ्नकर्त्तारः। शत्रवः पराभवं यांतु। शाम्यंतु घोराणि शाम्यंतु पापानि शाम्यंत्वीतयः । शुभानि वर्धतां। शिवा आपः संतु। शिवा ऋतवः संतु। शिवा ओषधयः संतु। शिवा वनस्पतयः संतु। शिवा आहुतयः संतु। शिवा अतिथयः संतु। अहोरात्रे शिवे स्यातां । निकामेनिकामेनः पर्जन्यो वर्षतु ।। फलिन्यो नओषधयः पच्यंतां

ह्याणाल्यानंतर, "मनः समाधीयतां ०" आदि प्रार्थना करावी (मूळांत पहावें).

योगक्षेमो नः कल्पतां ।। पुण्याहकालान् वाचयिष्ये। वाच्यतामिति प्रतिब्रूयुः। मह्यं सकुटुंबाय भक्तमाहेश्वरमहाजनान् नमस्कुर्वाणायाशीर्वचनापेक्षमाणाय। विवाहकर्मणः पुण्याहं भवंतो ब्रुवंत्विति स्वयं मंद्रस्वरेणोक्त्वा।। ॐ पुण्याहमिति। तथैव तैरुक्ते। पुनरेव मध्यस्वरेणोक्त्वा । तथैव तैरूक्ते । पुनरेवोश्चैःस्वरेणोक्ते। तथैव तैरुक्ते। स्वस्तये वाचमुपब्रुवामहै। सोमं स्वस्ति भुवनस्ययस्पतिः। बृहस्पतिं सर्वगणं स्वस्तये आदिव्यासो भवंतु नः। मह्यं सकुटुंबाय भक्तमाहेश्वरमहाजनान् नमस्कुर्वाणाय । आशीर्वचनमपेक्षमाणाय। विवाहकर्मणे स्वस्ति भवंतो ब्रुवंतु । विवाहकर्मणे स्वस्तीति तैरुक्ते । एवं त्रिर्वदेत् । ऋद्धयामस्तोमं सनुयाम वाजमानो मंत्र सरथे होपयातम् ।। यशोनु पक्वं मधुगोष्वंतराभूतां यशो अश्विनोः काममप्राः।। विवाहकर्मणे ऋद्धिं भवंतो ब्रुवंतु । ॐ ऋद्धयतां ऋद्धिः समृद्धिः । एवं त्रिरुक्त्वा। तत उत्तरकलशं दक्षिणहस्ते। दक्षिणकलशं वामहस्ते गृहीत्वा ताभ्यां धाराद्वयं पात्रे संततधारया निर्षिचेत् । वास्तोष्पते प्रतिजानीह्यस्मांत्स्वावेशो अनमीवो भवानः। यत्त्वेमहे प्रति तन्नो जुषस्व। शं न एधि द्विपदे शं चतुष्पदे ।। "औषधानि च रत्नानि कालस्यावयवाश्च ये। सरितः सागराः शैलास्तीर्थानि च हदा नदाः । एते त्वामभिषिं-

"पुण्याहकालान् वाचयिष्ये" असें ह्मटल्यानंतर "वाच्यताम्" असें ते ह्मणतील. "मह्यं सकुटुंबाय०" इत्यादि स्वतः आधीं गंभीर व मंद स्वरानें ह्मणून, "ॐ पुण्याहं" असें त्यांनी ह्मटल्यानंतर, पुनः आपण मध्यस्वरानें ह्मणून त्यांनीही तसेंच ह्मटल्यानंतर, पुनः आपण उच्च स्वरानें ह्मणून त्यांनीहीं तसेच ह्मटल्यानंतर; "स्वस्तये वाचमुपब्रुवामहै०" इत्यादि० ह्मणून त्यांनी "विवाहकर्मणे स्वस्ति" असें ह्मणटल्यानंतर; याप्रमाणें तीन वेळा ह्मणावें. "ऋद्धयाम स्तोमं०" इत्यादि-याप्रमाणें तीन वेळा ह्मणून; नंतर उत्तरकलश उजव्या हातीं घेऊन; त्या दोन्हीं कलशांनीं पात्रांत संततधारा सोडाव्यात. "वास्तोष्पते०" इत्यादि मंत्रांनीं यजमानानें

चंतु सर्वकाम्यार्थसिद्धये"। शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु। शिव शिवमस्तु। भगवान् शिवः प्रीयतां। इति भवंतो ब्रुवंतु। भगवांच्छिवः प्रीयतां। श्रियै यशसे बलायाभिर्षिचामि।। यजमानः स्वशिरसि कन्याशिरसि अभिर्षिचेत् । ते च मंत्राः । तत्सवितुर्वरेण्यं विश्वामित्रः सविता गायत्री। आपोहिष्ठेति नवर्चस्यांबरीषः । सिंधुद्वीप आपो गायत्री पंचमी वर्धमानः।। सप्तमी प्रतिर्ष्ठेत्ये द्वे अनुष्टुभौ। आपो हिष्ठा मयो भुवस्तान उर्जे दधातन। महेरणाय चक्षसे। यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयते हनः। उशतीरिव मातरः तस्मा अरंग मामवो यस्य क्षयाय जिन्वथ । आपो जनयथाचनः।। शंनो देवीरभिष्टये। आपो भवंतु। पीतये। शंयोरभिस्त्रवंतु नः। देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यामश्विनोर्भैषज्येन अग्रेस्तेजसा सूर्यस्य वर्चस्येंद्रस्येंद्रियेण बलाय श्रियै यशसेऽन्नाद्याय भूर्भुवःसुवरों अमृताभिषेकोस्तु इति सपल्लवैरभिषिंचेत् । ततः सुवासिनीभिः नीराजनं कार्ये। ततो माहेश्वरेभ्यः वैदिकाशिषो ग्राह्याः इति पुण्याहवाचनम्।।

अथ नांदीसमाराधनम् ।। तंडुलपूरितपात्रे फलं निधाय चतुर्विशतिमाहेश्वराराधनपरिमितं हिरण्यं दद्यात् । तद्यथा। देशकालौ संकीर्त्य अस्यां शुभतिथौ श्वः करिष्यमाणविवाहांगभूतनांदीशोभनदेवताप्रीत्यर्थं नांदीसमाराधनं करिष्ये इति संकल्प्य।।

स्वतःच्या व कन्येच्या डोक्यावर अभिषेक करावा. त्याविषयीं हे मंत्र आहेत. "आपोहिष्ठा मयोभुवः" इत्यादिक मंत्रांनीं हाती पल्लव घेऊन अभिषिंचन करावें. नंतर सुवासिनींनी निराजन करावें. नंतर माहेश्वरांकडून वैदिकाशीर्वाद (घ्यावेत) ग्रहण करावेत.–।। इति पुण्याहवाचनम् ।।–

अथ नांदी समाराधनम्।।

तांदुळाने भरलेल्या पात्रांत फल ठेवून २४ माहेश्वरांच्या पूजेस पुरेल इतकें हिरण्य द्यावें. ते असें. देशकालादिकांचें संकीर्तन करून,"अस्यां शुभतिथौ०"

श्रीनंदि। भृंगिरिटि। वीरक । वीरभद्र। पुष्पदंत। अंडाभरण। दंडपाणि। चंडेश्वर। रेणुक। दारुक। विकर्ण। विजयकर्ण। रेणुकर्ण। घंटाकर्ण। गोकर्ण। रेवणसिद्ध। मरुळसिद्ध। एकोराम। पंडिताराध्य। सुकेतु। रुरु । उपमन्यु। भृगु । दधीचि । गौतमादिप्रमथगणान् पुरातनभक्तमहागणानत्रावाहयामि। नंद्यादिमहागणाः सायुधाः सशक्तयः सपरिवाराः समागत्यात्र पूजां गृहंतु भवंत इति विज्ञाप्य।। अष्टविधार्चनं कुर्यात्। "हिरण्यगर्भगर्भस्थं हेमबीजं विभावसोः। अनंतपुण्यफलदमतः शांतिं प्रयच्छ मे।। अनेन हिरण्येन नांदीशोभनदेवताः प्रीयंतां।। इति द्रव्यं दद्यात् ।। चतुर्विंशतिमाहेश्वराराधनं कुर्यात् । इति नांदीविधानम् ।।

अथांकुरार्पणविधिः।। देशकालावनुकीर्त्य अमुकनाम्न्याः कन्यायाः अमुकनाम्नो वरस्य च श्वः करिष्यमाणविवाहांगभूतमंकुरारोपणं च करिष्ये। सुवर्णरजतताम्रमृण्मयान्यतमपात्रिकाः संपाद्य स्वस्तिवाचनपूर्वकं विघ्नेश्वरपूजां कृत्वा।। युवा सुवासाः परिवीत आगात्स उश्रेयान् भवति जायमानः। तं धीरासः कवय उन्नयंति स्वाध्यो३मनसा देवयंतः।। इत्यनेन वस्त्रयुग्ममास्तीर्य। तदुपरि अमुष्मिन् लोकं रुघ्रीयादिति सचरुं कुर्वीताग्नेघृतं विष्णोस्तंडुलास्तस्मात्।। इत्यनेने तंडुल-पुजं कृत्वा। तदुपरि धन्वनागा धन्वना जिंजयेम धन्वना तीव्राः समदो जये

इत्यादि संकल्प करावा. "श्रीनंदी०" इत्यादीकें करून महागणांची विज्ञापना करून, अष्टविधा पूजा करावी, "हिरण्यगर्भगर्भस्थं०" इत्यादिकांने द्रव्य द्यावें. २४ माहेश्वरांचे पूजन करावें. —।। इति नांदीविधानम्।।

अथांकुरारोपणम्।। देशकालादिकांचें अनुकीर्तन करून "अमुकनाम्न्याः०" इत्यादि संकल्प करावा. सोनें, रुपें, तांबें, व मोतीं, ह्यांशिवाय बाकी कशाचीही भांडी घेऊन, स्वस्तिवाचनपूर्वक, विघ्नेश्वरांची पूजा करून, "युवा सुवासाः" इत्यादिकांने दोन वस्त्रें आंथरून, त्यावर "अमुष्मिन् लोकं०" इत्यादिकांने तांदुळांच्या २ राशी करून त्यावर "धन्वनागा०" इत्यादि मंत्रानें ५ कोणांत दर्भ

माधन्व धनुःशक्रो रपकामं कृणोति। धन्वना सर्वाः प्रदिशो जयेमा वक्ष्यंति वेदागनिगंति कर्णप्रिय सखायं परिषस्वजाना।। इत्यनेन पंचकोणकान् दर्भानास्तीर्य पंचब्रह्ममंत्रैस्तन्मध्ये पंचपालिकाः निक्षिप्य।। एष रुद्रो यदग्निरोषधीः। प्रास्याग्रावादित्यं । जुहोति रुद्रा देवपशूनंतर्दधात्यथो ओषधीष्वेच पशून् प्रतिष्ठापयति । इत्यनेनाम्रपल्लवैरलंकृत्वा । ॐ हां नं सद्योजाताय नमः। ॐ हीं यं वामदेवाय०। ॐ हूं शिं अघोराय नमः। ॐ हैं वां तत्पुरुषाय नमः। ॐ हौं यं ईशानाय नमः।। इति पालिकासु पंचब्रह्ममंत्रैः पंचमूर्तीरावाह्य।। "मृत्तिके ह न मे पापं यन्मया दुष्कृतं कृतं ।। मृत्तिके ब्रह्मदत्तासि काश्यपेनाभिमंत्रिते। मृत्तिके देहि मे पुष्टिं त्वयि सर्वं प्रतिष्ठितं।। मृत्तिके प्रतिष्ठीते सर्व तन्मे निर्गुद मृत्तिके। त्वया हतेन पापेन गच्छामि परमां गतिम् ।।" इत्यनेन वल्मीकमृत्तिकां करीषचूर्णं च पंचपात्रेषु निक्षिप्य। ओषधयः संवदंते सोमेन सह राज्ञा। यस्मै करोति ब्राह्मणस्त राजन् पारयामसि । इत्यनेन माषमुन्दचणकगोधूमव्रीहिपंचबीजानि तोयेन प्रक्षाल्य पात्रेषु निक्षिपेत् । आपोहिष्टा मयो श्रुवस्तान ऊर्जे दधात न । महेरणाय चक्षसे। यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयते हनः । उशतीरिव मातरः।। तस्मा अरंग मामवो यस्य क्षयाय जिन्वथ । आपो जनयथा च नः।। अनेन कलशोदकं पालिकासु निर्षिच्य । अष्टविधार्चनं कुर्यात् ।। इति अंकुरार्पणविधिः।।

टाकून, त्यामध्यें पंचपालिका टाकून; "एषरुद्रो यदग्नि०" इत्यादिकें करून आंब्याच्या डाहळ्यांनी सुशोभित करावें. "ॐ -हां नं सद्यो०" इत्यादिकेंकरून त्या पालिकांमध्यें पंचब्रह्ममंत्रांनीं पंचमूर्तींचें आवाहन करावें. "मृत्तिकेहनमे०" इत्यादिकांनीं वारुळाची माती व करीष चूर्ण पंचपात्रांमध्ये टाकावें. "ओषधयः संवदंते०" इत्यादिकांनी, उडीद, मूग, चणक, गहूं, ब्रीहि, ही पंचधान्यें पाण्यानें धुऊन त्या त्या भांड्यांत घालावींत.

अथ मंटपदेवताप्रतिष्ठा ।। पूर्ववत् संकल्प्य।। श्वः करिष्यमाणविवाहकर्मांग-भूतमंटपदेवतास्थापनं च करिष्ये । इति संकल्प्य।। अर्थ सर्वैरनुस्त्राय। याजाता ओषधयो देवेभ्यस्त्रियुगं पुरा।। तासां पर्वराभ्यासं परिस्तरमाहरन्। मंदामित्रभ्रूणामहशतं घामानि सप्त च शतं वो अंब घामानि सहस्त्रमुतवो रुहः। अथ शतक्रत्वो यूयमिसं मे अगदं कृत । पुष्पावतीः प्रसूवतीः फलिनीरफरा उत। अश्वा इव सजित्वरीः वीरुधः पारयिष्णवः । याः फलिनिर्या अफला अपुष्पायाश्च पुष्पिणीः। बृहस्पतिप्रसूतास्तानो मुंचंत्व हसः। इति मंटपोपरि अक्षतान्निक्षिप्य। अथ शतरुद्रानावाहयेत्।। तदेवम् । इंद्रदिशि।। त्रातारमिंद्रमवितारमिंद्र हवेहवे हवेहवे सुहव शूरमिंद्रं। हुवेन शक्रं पुरुहूतमिंद्र स्वस्तिनो मघवा धात्विंद्रः। अनेन इंद्रं । कपिलेशाय नमः। अजाय०। बद्धाय०। वज्रदेहाय०। प्रमर्दनाय०। विभूतये०। अव्ययाय०। शास्त्रे०। पिनाकिने०। त्रिदशाधिपाय०। इंद्रवीर्या इंद्रपूजिता हे दशरुद्राः सवाहनाः सशक्तयः सपरिवाराः समागत्यात्र मंटपे मत्कृतानशेषोपचारान् स्वीकृत्य प्रसीदंतु भवंतः इत्यावाह्य पूजयेत् ।। अथाग्नेय्यां दिशि।। त्वं नो अग्ने वरुणस्य विद्वान् देवस्य हेडो वयासिष्ठाः यजिष्ठो ।। वह्नितमः शो शुचानो विश्वाद्वेषा।

"आपोहिष्ठा मयोभुवः०" इत्यादिकांनी कलशोदक पालिकांवर घालून, अष्टविध पूजा करावी—इत्यंकुरार्पणम् ।।

## अथ मंटपदेवताप्रतिष्ठा।।

पूर्वीप्रमाणे संकल्प करून; "श्वः करिष्यमाण०" इत्यादि संकल्प करावा. नंतर सर्वांची अनुमति घेऊन, "याजाता ओषधयो०" इत्यादिक मंत्रांनीं मंटपावर अक्षता टाकव्यात. नंतर शतरुद्रांचे आवाहन करावें (तें यथाविधि मागें शिवदीक्षाविधीत सांगितल्याप्रमाणे करावें. पुनरुक्तीस्तव येथे पुनः दिलें नाही.) — याप्रमाणें शतरुद्रांचे त्या त्या दिशेस आवाहन करून त्यांची पूजा करावी.

सि प्रमुमुग्ध्यस्मत् ।। अनेनाग्निमावाह्य। अग्निवीर्याय नमः । हुताशिने०। पिंगलाय०। स्वादकाय०। हराय०। ज्वलाय०। दहनाय०। बभ्रवे०। भस्मांतकाय०। क्षयांतकाय०। अग्निवीर्या अग्निपूजिता हे दश रुद्राः इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।। अथ यमदिशि।। सुगन्नः पंथामभरां कृणोतु।। यस्मिन्नक्षत्रे यमयेति राजा। यस्मिन्नेनमभ्यषिंचंत देवाः।। तदस्य चित्र हविषा यजाम। इति यमं।। तत्र।। विधाये नमः। कर्त्रे० । धात्रे०। श्रीकामाय०। सर्वनियोके०। याम्येशाय नमः। रमेशाय०। संयोके०। हराय०। यमपूजिता यमवीर्या हे दशरूद्राः इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।। अथ नैऋत्यां दिशि।। असुन्वंतमयजमान मिच्छस्ते नस्तेत्यांतस्करस्यान्वेषि । अन्यमस्मदिच्छस्तत इत्यानमो देवि निऋऋते तुभ्यमस्तु।। अनेन निऋऋतिमावाह्य ।। तत्र ।। नैऋतेशाय नमः। वरुणाय०। हंत्रे०। क्रूरदृष्ट्ये०। भयानकाय०। ऊर्ध्वकेशाय०। विरुपाक्षाय०। धूम्राय०। लोहिताय०। दंष्ट्रकाय०। नैऋतिवीर्याः नैऋतिपूजिता हे दशरुद्राः इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।।

अथ वरुणदिशि ।। तत्वायामि ब्रह्मणा वंदमानस्तदाशास्ते यजमानो हविर्भिः। अहेडमानो वरुणेह बोध्यु रुश समान आयुः प्रमोषीः । अनेन वरुणमावाह्य । बलाय नमः । अति बलाय०। पाशहस्ताय०। महाबलाय०। श्वेताय०। जयभद्राय०। दीर्घबाहवे०। बलांतकाय०। वडवामुखाय०। भैरवाय०। वरुणधीर्याः वरुणपूजिता हे दशरुद्रा । इत्यादिपूजांतं पूर्ववत् ।।

अथ वायव्यदिशि ।। आनो नियुभ्दिः स्यतिनीभि-रध्वरम् । सहस्त्रिणीभिरूपयाहि यज्ञं ।। वायो अस्मिन् हविषमादयस्व। यूयं पातु स्वस्तिभिः सदा नः ।। इत्यनेन वायुमा-

वाह्य।। अत्र ।। शीघ्राय नमः। लघवे०। वायुवेगाय नमः । सूक्ष्माय०। तीक्ष्णाय ० । भयंकराय०। पंचात्मकाय०। पंचशिखाय०। कपर्दिने०। मेघवाहनाय०। वायुवीर्या वायुपूजिता हे दशरुद्रा इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।।

अथ कुबेरदिशि । वय सोमव्रते तव ।। मनस्तनुषु बिभ्रतः। प्रजावंतो अशीमहि । इंद्राणी देवी सुभगा सुपत्नी । इत्यनेन कुबेरमावाह्य।। तत्र।। निधीशाय०। रुपवते०। धन्याय०। सौम्याय०। शांताय०। जटाधराय०। कामप्रसादाय०। लक्ष्मीशाय०। प्रकाशाय०। इंदुयज्ञपाय नमः। कुबरेवीर्याः कुबेरपूजिताः हे दशरुद्रा इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।।

अथ ईशानदिशि ।। तमीशानं जगतस्तस्थुषस्पतिं । धियं जिन्वमवसे हूमहे वयम् । पूषानो यथा वेदसामसद्वृधे।। रक्षिता पायुरदब्धः स्वस्तये। इत्यनेन ईशानमावाह्य।। तत्र ।। ईशानाय नमः।। विधेशाय०। ज्ञानवते०। मातृपिंगलाय०। भूतपालाय०। अजाय०। बलये०। मित्राय०। सर्वविद्याधिपाय०। सुखकृते०। ईशानवीर्या ईशानपूजिता हे दशरुद्रा इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।।

अथ वायव्यपश्चिमयोर्मध्ये अधस्तात् । अधोदिशि ।। स्योना पृथिवी भवानृक्षरानिवेशिनी। यच्छानः शर्मः सप्रथाः।। इत्यनेन विष्णुमावाह्य।। तत्र।। बलिप्रियाय नमः। विषधराय०। वीरोग्रसनाय०।। पालकाय०। शुभाय०। सुवीर्याय०। वृषभाय०। पातालेशाय०। लोहिताय०। अनंताय०। विष्णुवीर्या विष्णुपूजिता हे दशरुद्रा इत्यादि पूजांतं पूर्ववत् ।।

अथ पूर्वेशानयोर्मध्ये ऊर्ध्वोर्ध्वदिशि ।। अस्मे रुद्रा मेहना पर्वतासो वृत्रहत्ये भरहूतौ सजोषाः । यः शंसते स्तुवते धायि वज्रमिंद ज्येष्ठा अस्मान् अवंतु देवाः। इत्यनेन ब्रह्मा-

णमावाह्य ।। तत्र ।। अध्यक्षाय नमः ।। नभसे०। लिप्सवे०। शंभवे०। विभवे०। गणाध्यक्षाय०। विवाहाय०। गुणसंवाहाय०। व्यक्षाय०। त्रिदशवंदिताय०। ब्रह्मवीर्या ब्रह्मपूजिता हे दशरुद्रा इत्यादिपूजांतं पूर्ववत्।। एवं शतरुद्रान् तत्तद्दिक्ष्वावाह्य पूजयेत्।।

अष्टमंगलद्रव्याणि निक्षिप्य। याजाता।। इत्यनेन मंटपमभिमंत्र्य।। क्षेत्रैयैत्वा निर्ऋत्यै त्वाद्रुहो मुंचामि वरुणस्य पाशात् । अनागसं ब्रह्मणे त्वा करोमि शिवेते द्यावा पृथिवी उभे इमे।। इत्यनेन पंचविंशतिहस्तप्रमाण-दर्भपाशेन मंटपमावेष्टयेत् ।। ॐ मंडपाय नमः। ह्रीं पाशहस्ताय०। ह्रौंकार-स्वरूपाय नमः। ॐ कारशिरसे०। वकारहस्ताय०। यकाराभयवरप्रदाय०। नकारदेहाय०। मकारपीठाय०। महाधर्माय०। शिवाय सच्चिदानंदविग्रहाय०। अं आं ज्योतिर्लिंगस्वरुपाय हृदयाय०। तीक्ष्णश्रृंगाय विद्महे। वेदपादाय धीमहि । तन्नो वृषभः प्रचोदयात् ।। इति मंटपस्य पूर्वदिशि नंदिनमावाहयेत् । एकदंताय विद्महे। वक्रतुंडाय धीमहि। तन्नो विघ्नेश्वरः प्रचोदयात् । इति दक्षिणदिशि विघ्नेश्वरमावाहयेत् ।। तत्पुरुषाय विद्महे। महासेनाय धीमहि। तन्नो षण्मुखः प्रचोदयात् ।। इति पश्चिमदिशि षणमुखमावाहयेत् ।। तत्पुरुषाय विद्महे। महारौद्राय धीमहि। तन्नो वीरः प्रचोदयात् ।। इत्युत्तरदिशि वीरभद्र-मावाहयेत्।। गणांबिकायै विद्महे। महातपायै धीमहि।

अष्टमंगलद्रव्यें टाकून, "या जाता०" इत्यादिकांनी मंटप अभिमंत्रून, "क्षेत्रैयैत्वा०" इत्यादिकांनें २५ हात लांब दर्भपाशानें मंटपास आवेष्टन करावे. "ॐ मंटपाय नमः०" इत्यादिकांनी मंटपाच्या पूर्वदिशेस नंदीचें आवाहन करावें. "एकदंताय विद्महे०" इत्यादिकांनी दक्षिणदिशेस विघ्नेश्वराचें आवाहन करावें, "तत्पुरुषाय विद्महे०" इत्यादिकांनी पश्चिम दिशेस षण्मुखाचे आवाहन करावें. "गणांबिकायै०" इत्यादिके करून मंटपाच्या मध्यें उमामहेश्वरांचे आवाहन

तन्नो गौरी प्रचोदयात् ।। ॐ हां व्योमव्योमाय विद्महे सूक्ष्मसूक्ष्माय धीमहि। तन्नो शिवः प्रचोदयात् ।। इति मंटपमध्ये उमामहेश्वरावावाह्य षोडशोपचारैः संपूजयेत् ।। इति महादेवतास्थापनविधिः ।।

अथ कौतुकबंधनम् ।। श्वः करिष्यमाणविवाहकर्मांगभूतकौतुकबंधनं करिष्ये इति संकल्प्य।। तंडुलैः पूरितपात्रे क्रमुकानांफलैः सह न्यस्ते तांबूलपत्राणि तेषु भस्म विधाय च ।। कौतुकं षोडशोपचारैः संपूज्य। त्रियंबकमंत्रेण भस्मना संमृज्य तेनैव मंत्रेण वरस्य दक्षिणकरे बध्नीयात् । स्त्रीणां तु वामकरे बध्नीयात्।।

अथ विवाहदिनकर्तव्यम् । वधूपिता सपत्नीकः कृताभ्यंगो धृतमांगलिकवेषः कृतलेपनरंगमालिके मंटपस्य पुरोभागे शुभासने प्राड्मुख उपविश्य।। स्वदक्षिणतः पत्नीं तद्दक्षिणतः कन्यां चोपविश्य । आचम्य।। इष्टदेवतागुर्वादीन् नमस्कृत्य। अप उपस्पृश्य। प्राणानायम्य। देशकालावनुकीर्त्य। अमुकगोत्रोत्पन्नाया। अमुकनास्याः कन्याया अमुकगोत्रोत्पन्नवरस्य च अद्य करिष्यमाणविवाहकर्म-

करून, त्यां सर्वांचीं षोडश उपचारेंकरून, पूजा करावी-।। इति मंटपदेवता-स्थापनाविधिः।।

अथ कौतुकबंधनम् ।।— "श्वः करिष्यमाण विवाह०" इत्यादि संकल्प करून, तांदुळांनी भरलेल्या पात्रांत क्रमुकाच्या फळांसह (सुपारीसह) तांबुलाचीं पानें ठेवून, व त्यावर भस्म घालून, कौतुक षोडश उपचारांनी पुजून, त्र्यंबकमंत्रानें भस्म लावून, त्याच मंत्रानें वराच्या उजव्या हाती बांधावें; व वधूच्या डाव्या हाती बांधावें असें समजावें —

अथ विवाहदिनकर्तव्यम् ।।

वधूपिता पत्नीसह अभ्यंगस्नान करून, मंगलवेष धारण करून, सारवून रांगोळी वगैरे घातलेल्या, मंटपाच्या पुढच्या भागांत शुभासनावर पूर्वमुख बसून; आपल्या उजवेकडेस पत्नीस व तिच्या उजवेकडेस कन्येस असें बसवून; आचमनानंतर इष्टदेवता व गुरु यांचे स्मरण करून, पाण्यास स्पर्श करून, प्राणा-यामानंतर देशकालादिकांचे अनुकीर्तन करून; "अमुकगोत्रोत्वन्नायाः०" इत्यादि

प्रयुक्तईशानदिपंचकलशस्थापनं करिष्ये इति संकल्प्य।। महीद्योःपृथिवीचन इमं यज्ञं मिमिक्षतां । पिपृतान्नो भरीमभिः। इति भूमिं स्पृष्टा जपेत्। ओषधयः संवदंते सोमेन सह राज्ञा । यस्मै करोति ब्राह्मणस्त राजन् पारयामसि। इति प्रतिकलशं द्विपस्थधान्यं पात्रेषु निदध्यात् । तद्धान्योपरि तदर्थतंडुलं तदुपरि तदर्धतिलं निदध्यात् । तत्र। आकलशेषु धावति श्येनो वर्म विदाहते। अभिद्रोणाकरिनक्रदत् । इति सौवर्णाद्यन्यतमकलशान् निदध्यात् । इमं मे गंगे यमुने सरस्वति शितुद्रिस्तोमं सचता परुष्ण्या।। असिक्रिया मरुदृधे वितस्तया र्जीकिये शृणुह्या सुषोमया। आपो वा इद सर्वविश्वा भूतान्यापः प्राणा वा आपः । पशव आपः। सम्राडापो। विराडापः। स्वराडापः छंदा ष्यापः। ज्योती ष्यापः। यजू ष्यापः। सत्यमापः। सर्वदेवता आपः। भूर्भुवः सुवरापः। ॐ इति मंत्राभ्यां तीर्थोदकमभिमंत्र्य। ईशानादिसद्योमंत्रेण कलशेषु जलं पूरयेत् ।। "गंधद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीं।। ईश्वरी सर्वभूतानां तामिहोपह्वये श्रियं" इति कलशेषु शिवाष्टगंधं निदध्यात् ।। कांडात् कांडात् प्ररोहंति परुषः परुषः परी।। एवानो दूर्वे प्रतनु सहस्त्रेण शतेन च । इति पंचपल्लवपंचत्वग्दूर्वाश्च दद्यात् ।। स्योना पृ-

संकल्प करावा "महीद्यौः पृथिवीचन॰" इत्यादि मंत्र भूमीस स्पर्श करून जपावेत. "ओषधयः संवदंते॰" इत्यादि मंत्रानें प्रत्येक कलशीं प्रस्थ धान्य घालावें (पांचही कलशामंध्ये). त्या धान्यावर तदर्ध तांदूळ, त्यावर तदर्ध तिल घालावेत तेव्हां "आकलशेषु॰" इत्यादि मंत्रांनीं सोनें वगैरे कशाचेही कलश ठेवावेत. "इमं मे गंगे॰" इत्यादिक मंत्रांनीं तीर्थोदक अभिमंत्रून, ईशानदि सद्योमंत्रांनी कलशांमध्ये जल भरावें. "गंधद्वारा" इत्यादिकांनी कलशांत शिवाष्टगंध घालावें. "कांडात् कांडात्॰" इत्यादिकांनी पंच पल्लव, पाच झाडांच्या साली, व दूर्वा-हीं त्या कलशांत घालावींतं. "स्योना पृथिवी॰" इत्यादिकांनी पांच

धिवी भवा नृक्षरानिवेशिनी । यच्छानः शर्म सप्रथाः ।। इति पवित्रपंचमृत्तिका निक्षिपेत् ।। सहिरत्नानि दाशुषे। सुवाति सविताभगः। तं भागं चित्रमीमहे। इति पंचरत्नानि निक्षिपेत् । हिरण्यरूपः सहिरण्यसंदृगपांनपात्से दुहिरण्य-वर्णः। हिरण्ययात्परियोनेर्निषद्य हिरण्य दादत्यन्नमस्मै ।। इति सुवर्णप्रतिमां दद्यात् ।। "पूर्णा दर्वी परापतेति फलं दद्यात् । युवा सुवासाः परिवीत आगात् । स उश्रेयान् भवति जायमानः।। तंधीरासः कवय उन्नयंति।। स्वाध्यो ३ मनसा देवयंतः। इति वस्त्रं दद्यात् ।। तंतु तन्वन्नजसो भानुमन्वहि । ज्योतिष्मतः पथो रक्षाधिया कृतान् ।। अनुल्बणं पयसजो गुवामषो जनुर्भव जनया दैव्यं जनं। इति श्वेततंतुभिर्वेष्टयेत् ।। पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते प्रभुर्गात्राणि पर्येषि विश्वतः। अतप्ततनूर्न तदामोऽश्रुते।। श्रितास इद्वहंतस्तत्समाशत इति दर्भकूर्चं दद्यात् ।। याः फलनीर्या अफला अपुष्पायाश्च पुष्पिणीः।। बृहस्पतिप्रसतूतास्तानो मुंचंत्व हसः। इति पूगपूष्फलानि दद्यात् ।। इति पंचकलशानलंकृत्य तत्र कलशपूजार्थ ऋत्विजो वृणीयात् ।।

आसनप्राणायामसंकल्पः।। एवं गुणविशिष्टायामस्यां शुभतिथौ अमुकगोत्रोत्पन्नायाः अमुकनाम्याः कन्यायाः अमुकगोत्रोत्पन्नस्य

पवित्र मृत्तिका त्यांत घालाव्यात. "सहिरत्नानि०" इत्यादिकांनी पांच रत्न घाला-वेत. "हिरण्यरूपः" इत्यादिकांनी सुवर्णप्रतिमा घालावी. "पूर्णा दर्वीपरा०" इत्यादीनी वस्त्र घालावें. "तंतु तन्वन् रजसो०"इत्यादिकांनी श्वेत तंतूंनीं वेष्टन करावें. "पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते०" इत्यादिकांनी दर्भकूर्च द्यावें. "याः फलिनीर्या०" इत्यादिकांनी पूगिपुष्प व फल द्यावींत. याप्रमाणें पंचकलश अलंकृत करून त्या तया कलशाच्या पूजेस्तव ऋत्विज शोधून (निवडून) काढावेत.

**आसनप्राणायामसंकल्पः।।**—"एवंगुणविशिष्ट०" इत्यादिक संकल्प करावा. (नंतर ईशानादि पंच कलश पूजार्थ मागें शिवदीक्षा विधींत सांगितल्या

वरस्य च अद्यकरिष्यमाणविवाहकर्मप्रयुक्तपंचकलशपूजार्थ ऋत्विजो वरिष्ये।। अथेशानकलशपूजार्थं ईशानमुखोभ्द्भूतं विश्वाराध्यं गुरुं त्वां वृणीमहे।।ॐ नमो भगवत्ते आगमाध्ययनाय शुध्दनीलवर्णाय ईशानुखोभ्दताय मध्यमकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय अपरिमितभक्तगणाधीश्वराय चिन्मुद्रांकिताय अत्याश्रमाय षट्कतिप्रणवजापकाय अपरिमितशिखाय क्रियाकंथाय बिल्वदंडाय कारुण्यमूर्तये नमः। इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन गुरुकलशपूजां कारयेत् ।।

अथ पूर्वस्यां दिशि सद्योजातकलशपूजार्थ सद्योजातमुखोभ्द्भूतं रेवणसिध्दं त्वा वृणीमहे।। ॐ नमो भगवते रेवणसिद्धाय ऋग्वेदशाखाध्ययनाय पीतवर्णाय सद्योजातमुखेभ्दताय पूर्वकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय द्वादशसहस्त्रचरलिंगाध्यक्षाय गुरुधर्मभिक्षां देहीति मुद्रांकिताय गृहस्थाश्रमाय शिवपंचाक्षरीजापकाय षट्त्रिंशज्जटामुकुटमंडिताय स्वर्णकंथाय अश्वत्थदंडाय घनलिंगाय नमो नमः।। इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन सद्योजातकलशपूजां कारयेत् ।।

अथ दक्षिणदिशि वामदेवकलशपूजार्थ वामदेवमुखोद्तमरूळाराध्यमाचार्यं त्वां वृणीमहे।। ॐ नमो भगवते मरुळाराध्याय यजुर्वेदाध्ययनाय श्वेतवर्णाय वामदेवमुखोद्ताय दक्षिणकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय असंख्यातचरलिंगाध्यक्षाय भवति भिक्षां देहीति मुद्रांकिताय ब्रह्मचर्याश्रमाय गायत्रीजापकाय पंचशिखाय श्वेतकंथाय पालाशदंडाय ब्रह्मचारिणे नमो नमः।। इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन दक्षिणकलशपूजां कारयेत् ।।

अथ पश्चिमदिशि ।। अघोरकलशपूजार्थ अघोरमुखोद्ताय एको-

प्रमाणें ते ते ऋत्विज बोलावून त्यांची पूजा करावी.) असो. याप्रमाणें ऋत्विजांची पूजा करावी.

रामाराध्यदेवं त्वां वृणीमहे।। ॐ नमो भगवते एकोरामाराध्यदेवाय सामवेदशास्त्राय रक्तवर्णाय पश्चिमुखोभ्द्ताय पश्चिमकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय त्रिसहस्त्रचरलिंगाध्यक्षाय लिंगार्पितभिक्षां देहीति मुद्रांकिताय वानप्रस्थाश्रमाय सूक्ष्मपंचाक्षरीमंत्रजापकाय एकशिखाय रक्तकंधाय न्यग्रोधदंडाय वानप्रस्थाश्रमाय नमो नमः।। इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेन पश्चिमकलशपूजां कारयेत् ।।

अथोत्तरदिशि तत्पुरुषकलपूजार्थं तत्पुरुषमुखोद्तं पंडिताराध्यं त्वां वृणीमहे।। ॐ नमो भगवते पंडिताराध्याय अथर्वणशाखाध्यनाय हरिद्वर्णाय तत्पुरुष मुखोभ्दताय उत्तरकलशाधीश्वराय लिंगयज्ञोपवीतिने शिवलांछनधारकाय षट्सहस्त्रचरलिंगाध्यक्षाय दयाधर्मभिक्षां देहीति मुद्रांकिताय विरक्ताश्रमाय ॐ नमो हंसायेति जापकाय एकादशजटामुकुटमंडियात हरित्कंथाय वेणुदंडाय विरक्ताश्रमाय नमो नमः।। इति ऋत्विजं पूजयित्वा तन्मुखेनोत्तरदिक्कलशपूजां कारयेत् ।।

अथ कलशपूजा ।। ईशानकलशपूजां करिष्ये।। तदंगत्वेन प्राणप्रतिष्ठापनं च करिष्ये।। ईशानप्राणप्रतिष्ठापनमंत्रस्य ब्रह्मा ऋषिः। बृहतीच्छंदः । ईशानो देवता। ईशान इति बीजं । ईश्वरी इति शक्तिः । सदाशिवों इति कीलकं। ईशानप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः। ईशानः सर्वविद्यानां अंगुष्ठाभ्यां नमः। ईश्वरः सर्वभूतानां तर्जनीभ्यां०। ब्रह्माधिपतिर्मध्यमाभ्यां नमः। ब्रह्मणोधिपतिः अनामिकाभ्यां नमः। ब्रह्मा शिवो मे अस्तु कनिष्ठिकाभ्यां नमः। सदाशिवों करतलकरपृष्ठाभ्यां नमः।। ईशानः सर्वविद्यानां हृदया

अथ कलशपूजा ।। —(त्याचप्रमाणें पंच कलशांची पूजा देखील, शिवदीक्षा विधींत सांगितलेल्याप्रमाणे त्या त्या कलशांत त्या त्या देवतांचे आवाहन करून त्यांची पूजा करावी). असो.

इति पंचकलशस्थापनविधिः।।

नमः। ईश्वरः सर्वभूतानां शिरसे स्वाहा। ब्रह्माधिपतिः शिखायै वषट् । ब्रह्मणोऽधिपतिः कवचाय हुं। ब्रह्मा शिवो ने अस्तु नेत्रत्रयाय वौषट्। सदाशिवों अस्त्राय फट् ।। ध्यानं ।। ईशानः सर्वविद्यानां ईश्वरः सर्वभूतानां ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मा शिवो मे अस्तु सदाशिवों ।। ईशानस्य प्राणा इह प्राणा ईशानस्य जीव इह स्थितः।। ईशानस्य सर्वेंद्रियाणि कायवाङमनश्चक्षुः श्रोत्रजिव्हाप्राघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा।। प्रसादलिंगाय नमः।। श्रोत्रेंद्रियात्मने०।। शरणस्थलस्वरुपाय०।। शांत्यतीतकलात्मने०।। शब्दग्रहणसाधनाय०।। पराशक्त्यै०।। शिवसादाख्यात्मने ईशानमूर्यत्त०।। सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा ।। सप्त मुद्राः प्रदर्श्य।। सद्योजातं प्रपद्यामि इत्यासनं । सद्योजाताय वै नमः इति पाद्यं। भवे भवे नातिभवे इति अर्ध्यं। भवोभ्दवाय नम इत्याचमनीयं। वामदेवाय नम इति स्नानं। ज्येष्ठाय नम इति वस्त्रं। श्रेष्ठाय नमः इत्युत्तरीयं। रुद्राय नम इति गंधं। कालाय नम इत्यक्षतान् । कलविकरणाय नम इति पुष्पं। बलविकरणाय नम इति धूपं। बलाय नम इति दीपं। बलप्रमथनाय नम इति काले नैवेद्यं। सर्वभूतदमनाय नम इति तांबूलं। मनोन्मनाय नम इति मंत्रपुष्पं। सर्वभूतदमनाय नम इति प्रदक्षिणाद्युपचारान् कृत्वा । मूलमष्टोत्तरशतं जपेत् ।।

अथ पूर्वदिशि सद्योजातकलशपूजां करिष्ये।। तद्गत्वेन प्राणप्रतिष्ठां करिष्ये।। सद्योजातप्राणप्रतिष्ठामनमंत्रस्य। ब्रह्मर्षिः। उष्णिक् छंदः। सद्योजातमूर्तिर्देवता । सद्योजातमिति बीजं । प्रपद्यामीति शक्तिः। भवोद्व इति कीलकं। सद्योजातप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः। सद्योजातं अंगु०। प्रपद्यामि तर्ज०। सद्योजाताय वै नमो नमः मध्य०। भवे भवे अना०। नातिभवे भवस्व मां कनि०। भवोद्वाय नमः करतल०।। सद्योजातं हृदयाय०। प्रपद्यामि शिरसे०। सद्योजाताय वै नमो नमः शिखायै०। भवे भवे कवचाय०। नातिभवे भवस्व मां नेत्रत्रयाय० । भवोद्वाय नमः

अस्त्राय०।। ॐ भूर्भुवस्वरोमिति दिग्बंधः।। अथ ध्यानमंत्रः।। सद्योजातं प्रपद्यामि सद्योजाताय वै नमो नमः। भवे भवे नाति भवे भवस्व मां भवोद्वाय नमः। सद्योजातस्य प्राणा इह प्राणाः सद्योजातस्य जीव इह स्थितः। सद्योजातस्य सर्वेंद्रियाणि कायवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा । आचारलिंगाय नमः। भक्तस्थलस्वरूपाय०। घ्राणेंद्रियात्मने०। निवृत्तिकलाय०। गंधग्रहणसाधनाय०। क्रियाशत्क्यात्मने०। कर्मसादाख्याय० सद्योजातमूर्तये०। सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा ।। सप्त मुद्राः प्रदर्श्य । पूर्ववदुपचारान् प्रकल्प । मूलमंत्रमष्टोत्तरशतं जपेत् ।।

अथ दक्षिणदिशि वामदेवकलशपूजां करिष्ये।। तदंगत्वेन प्राणप्रतिष्ठापनं करिष्ये।। अस्य श्रीवामदेवप्रतिष्ठापनमंत्रस्य । ब्रह्मर्षिः। शक्वरीच्छंदः। वामदेवो देवता। वामदेव इति बीजं । रुद्र इति शक्तिः। सर्वभूतदमनाय नम इति कीलकं। वामदेवप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः। वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमः अंगु०। श्रेष्ठाय नमो रुद्राय नमः तर्ज०। कालाय नमः कलविकरणाय नमः मध्य०। बलविकरणाय नमो बलाय नमः अना०। बलप्रमथनाय नमः सर्वभूतदमनाय नमः कनिष्ठि०। मनोन्मनाय नमः करतल०। एवं हृदयदिन्यासः । ध्यानमंत्रः । वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमः श्रेष्ठाय नमो रुद्राय नमः कालाय नमः कलविकरणाय नमो बलविकरणाय नमो बलाय नमो बलप्रमथनाय नमः सर्वभूतदमनाय नमो मनोन्मनाय नमः। वामदेवस्य प्राणा इह प्राणाः वामदेवस्य जीव इह स्थितः। वामदेवस्य सर्वेंद्रियाणि कायवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा।। गुरुलिंगाय नमः। जिव्हेंद्रियात्मने०। माहेश्वरस्थलस्वरूपाय०। प्रतिष्ठाकलाय०। रसग्रहणसाधनाय०। ज्ञानशक्त्यात्मने०। कर्तृसादाख्याय०। वामदेवाय०।

सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा ।। अथ सप्तमुद्राप्रदर्शनपूर्वकं पूर्ववत् पूजां कारयेत्। मूलमंत्रं अष्टोत्तरशतं जपेत् ।।

अथ पश्चिमदिशि अघोरकलशपूजां करिष्ये।। तदंगत्वेन प्राण-प्रतिष्ठापनं करिष्ये।। ॐ अस्य श्रीअघोरमंत्रस्य । ब्रम्हर्षिः । त्रिष्टुप् छंदः। अघोरेभ्य इति बीजं । सर्वेभ्य इति शक्तिः। रुद्ररूपेभ्य इति कीलकं। अघोरप्राणप्रतिष्ठार्थे जपे विनियोगः। अघोरेभ्यः अंगु०। अथ घोरेभ्यः तर्ज०। घोरघोरतरेभ्यः मध्य०। सर्वेभ्यः अना०। सर्वशर्वेभ्यः कनि०। नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः करतल०। एवं हृदयादिन्यासः।। ध्यानमंत्रः।। अघोरेभ्योऽथ घोरेभ्यो घोरघोररेभ्यः। सर्वेभ्यः सर्वशर्वेभ्यो नमस्ते अस्तु रुदरूपेभ्यः।। अघोरस्य प्राणा इह प्राणा अघोरस्य जीव इहस्थितः। अघोरस्य सर्वेद्रियाणि कायवाङ्मनश्रक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा।। शिवलिंगाय नमः। नेत्रात्मने०। प्रसादस्थलस्वरूपाय०। विद्याकलायै०। रूपग्रहणसाधनाय०। मूर्तसादाख्याय०। अघोरमूर्तये०। इच्छाशक्तये०। सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा।। सप्तमुद्राप्रदर्शनपूर्वकं पूर्ववदुपचारान् प्रकल्प मूलमंत्रमष्टोत्तरशतं जपेत् ।।

अथोत्तरदिशि । तत्पुरुषपूजां करिष्ये ।। तदंगत्वेन प्राणप्रतिष्ठापनं करिष्ये अथ श्रीतत्पुरुषप्राणप्रतिष्ठापनमंत्रस्य । ब्रह्मर्षिः। गायत्री छंदः। तत्पुरुषो देवता । तद्बीजं । महादेवायेति शक्तिः। रुद्र इति कीलकं। तत्पुरुषप्राणपतिष्ठार्थे जपे विनियोगः।। तत्पुरुषाय अंगु०। विघ्नहे तर्ज०। महादेवाय मध्य०। धीमहि अना०। तन्नो रूद्रः कनि०। प्रचोदयात् करतल०।। तत्पुरुषाय हृदया० विघ्नहे शिरसे० महादेवाय शिखायै० धीमहि कवचाय हुं तन्नो रुद्रः नेत्रत्रयाय० प्रचोदयात् अस्त्राय० ध्यानं ।। तत्पुरुषाय विघ्नहे। महादेवाय धीमहि । तन्नो रुद्रः प्रचोदयात् ।। तत्पुरुषस्य प्राणा इह प्राणा

तत्पुरुषस्य जीव इह स्थितः। तत्पुरुषस्य सर्वेंद्रियाणि कायवाङ्मनश्चक्षुः-श्रोत्रजिव्हाघ्राणप्राणा इहैवागत्य सुखं चिरं तिष्ठंतु स्वाहा ।। त्वगिंद्रियात्मने नमः। जंगमलिंगाय०। प्राणलिंगस्थलाय०। शांतिकलायै०। आदिशक्त्यै०। स्पर्शविषयात्मने०। अमूर्तसादाख्याय०। तत्पुरुषब्रह्मणे० सांनिध्यं कुरु कुरु स्वाहा सप्तसमुद्राप्रदर्शनपूर्वकं पूर्ववदुपचारान् प्रकल्प्य मूलमंत्रमष्टोत्तरशतं जपेत् ।।

इति पंचकलशस्थापनविधिः।।

अथ वधूवरयोः फालफलकधारणं ।। शुभके शिर आरोह शोभयंति मुखं मम ।। मुख हि मम शोभया भूया संछ भ कुरु ।। यामाह रज्जुं जमदग्निश्रद्धायै कामाया वै इमां त्वामपि नह्येहं भगेन सह वर्चसा।। इति मंत्रेण शोभनसूचनार्थ वीरमाहेश्वरसंनिधौ मंगलतूर्यैः सह वधूवरयोर्ललाटे फालफलकं बध्नीयात् ।। गंधाक्षतपुष्पमालाभूषितः सन् । भक्तमाहेश्वरेष्ट-देवतादीन् नमस्कारं कृत्वा तथा पित्रादींश्रव नमस्कृत्य तैरनुमोदितो यथाविभवमश्वादियानमारुह्य स्वर्चितैर्ज्ञातिबांधवैरन्यैर्माहेश्वरैः पुरंध्रीभिः। धृतछत्रपूर्णकलशदर्पणपुष्पाक्षतदीपमालाध्वजाजैर्मगलं तूर्यादिभिश्च सह वधूगृहं गत्वा तद्धारदेशे प्राङ्मुखः स्थितः।। नीराजनपूर्णकुंभादि-

अथ वधूवरयोः फालफलकधारणम् ।। –("बाशिंग" ह्मणून प्रसिद्ध आहे त्याचें धारण)— "शुभके शिर आरोह०" ह्या मंत्रानें शोभन चिन्हार्थ वीरमाहेश्वरांवजळ मंगळवाद्यें वाजत असतां वधू व वर यांच्या कपाळास बाशिंग बांधावें. गंध, अक्षता, व फुलांच्या माळा यंनी विभूषित होऊन, भक्तमाहेश्वर व इष्टदेवता इत्यादिकांस नमस्कार करून, त्याचप्रमाणें पितरांसही वंदन करून, त्यांच्या अनुमतीनें आपापल्या शक्तीस अनुसुरून अश्वादि वाहनावर बसून; आपण पूज्य मानिलेले ज्ञातिबांधव इतर माहेश्वर, व पुरंध्री, (पुत्रवती स्त्रिया), यांच्यासह; पुर्वकडचा कलश, छत्र, पुष्प, अक्षता, माला, दीपध्वज, लाजा, वगैरे घेऊन, मंगळवाद्यें वाजवीत; वधूगृही जाऊन, तेथें दाराजवळ पूर्वमुख राहावें. नीराजन, व पूर्णकुंभादि घेऊन सामोरे आलेल्या पुत्रवती स्त्रियांकडून नीराजन

युताभिः पुरंध्रीभिः प्रत्युद्यातो नीराजनपूर्वकमंतर्गृहं प्रविश्य।। मंटपस्योत्तरदेशे दर्भास्तीर्णे चतुःपादभद्रपीठे प्राङ्मुखपविशेत् ।।

अथ मधुपर्कः ।। पाद्यार्थं।। अर्घ्यार्थं ।। मंत्रवत्रिराचमनीयार्थं।। शुद्धाचमनीयार्थ। जलपात्रचतुष्टयं ।। मधुयुक्तदधिपूतिकांस्यपात्रं ।। पंचविंशतिदर्भैरवागग्रमावृतं विष्टरं च संपाद्य । प्राणानायम्य। देशकालौ संकीर्त्य। कन्यार्थिनं गृहमानतं। इमं वरं कन्यादानांगभूतमधुपर्केणार्हयिष्ये। इति संकल्प्य।। प्रागुक्तलक्षणं दर्भमयं कूर्चं पंचाशता भवेत् ब्रह्मपंचविंशतिविष्टरः।। विष्टरो विष्टरो विष्टरः । प्रतिगृह्यताम् ।। इति आसनार्थं वरहस्ते दद्यात् ।। वरः प्रतिगृह्णामीत्युक्त्वा ।। अहं वर्षस्वित्यस्य वामदेवो विष्टरोऽनुष्टुप् विष्टरोपवेशने विनियोगः। अहं वर्षसु जातानां विद्युतामिव सूरि इदं तमधितिष्ठामि यो मा कश्चाभिदासतीति । उदगग्रे विष्टरे उपविशेत् । इति विष्टरमंत्रेण पद्यामाक्रम्य चासीत । पाद्यं । पाद्यं। पाद्यं। प्रतिगृह्यताम् । प्रतिगृह्णामीति वरो गृह्णीयात् । अस्मिन् राष्ट्रे श्रियमावेशयाम्यतो देवी प्रतिपश्याम्यापः ।। दक्षिणं पादमवने निजेऽस्मिन् राष्ट्रमिंद्रियं दधामि । सव्यं पादमवने निजेऽस्मिन् राष्ट्रमिंद्रियं वर्धयामि। पूर्वमन्यमपरमन्यं

(आरती) ओंवाळून घेतल्यानंतर आंत (घरीं) जावें. मंटपाच्या उत्तरेस दर्भानें आस्तीर्ण अशा चार पायांच्या भद्रपीठावर (चौकीवर) बसावें.

**अथ मधुपर्कः** ।। पाद्यार्थं, अर्घ्यार्थ, व मंत्रयुक्त तीन वेळा आचमन करण्यास्तव; मधासहित दह्यानें भरलेले कांस्यपात्र द्यावें. २५ दर्भांनी एक विष्टर पश्चिमेस दर्भाग्र असलेलें करावें. नंतर प्राणायाम करून देशकालादिकांचे संकीर्तन करावें मग "कन्यार्थिनं गृह०" इत्यादि संकल्प करावा. मागें सांगितलेलें दर्भमय विष्टर (आसन) "पंचाशता भवेत् ब्रह्मा०" इत्यादि मंत्रानें, वराच्या हातीं बसण्याकरितां द्यावें. वरानें "मी तें घेतों" असें ह्मणावें. नंतर "अहं वर्षसु जातानां०" इत्यादि विष्टरमंत्रानें त्या आसनावर पाय पसरून बसावें. "अद्यं" असें तीन वेळा ह्मणून हें घ्यावें असें वरास ह्मणावें. "मी घेतो" असें वरानें उत्तर द्यावें. नंतर "अस्मिन् राष्ट्रे०" इत्यादि मंत्र ह्मणटल्यानंतर दात्यानें त्या उदकानें

# वीरशैव धर्माचा औध्वदिहिक (समाधी) संस्कार विधी

**शि.बा.स्वामी मानखेडकर**

**(संदर्भ ग्रंथ, मकुटागम, चंद्रज्ञानागम व लिंग धारण चंद्रिका)**

वीरशैव धर्म हा एक स्वतंत्रधर्म आहे. याचा स्वतंत्र एक धर्मग्रंथ असून या ग्रंथात धर्माचे तत्त्वज्ञान व आचरविधी याची सांगोपांग चर्चा केलेली आहे.

या धर्माप्रमाणे पींडावर (शरीरावर) पुढील संस्कार केले जातात.

**"गर्भाधानं पुसवनं सीमंत जातकर्मच।।**
**तन्मामकरणं चापि बहिर्निष्क्रमण तथा।।**
**चौल कर्म तथैवोक्तं वेदांरभोहि युक्तितः।।**
**शिवदीक्षा विवाहश्च संस्कार मुख्यकाः"(परमरहस्य)**

**१६ संस्कार :**

(१) गर्भाधान (ओटीभरण) (२) पुसवंन (३) सिमंत (४) आतकर्म (५) नामकरण (६) बर्हिनिष्काम (जंगमाचा किंवा घरातील आदर्श व थोर व्यक्तिचा हातधरून पाच पावले चालवणे दार ओलांडणे) (७) चोलकर्म (८) वेदारंभ (९) दीक्षा (१०) विवाह.

हे मुख्य व महाव्रत, उपनिषद व्रत, महानाम्नीव्रत केशान्त, गोदान हे वीरशैवाना मान्य नाहीत १६ वा संस्कार हा अंत्य संस्कार होय.

यापैकी वीरशैवा मध्ये जो अंत्य संस्कार असतो यालाच समाधी संस्कार म्हणतात. वीरशैवात दाह संस्कार नसतो. दाह संस्कार 'प्रेता'ला करतात. यामुळे हा प्रोणात्क्रमण झालेला जीव पितर लोकात जातो.

जे वीरशैवाना काही कारणाने दाह संस्कार करतात तो जीव नरकाला जातो. म्हणून वीरशैवानी कधीच दाह संस्कार करु नये.

वीरशैव कुलोत्पन्न जीव कसाही असला तरी त्याची अंत्यक्रिया वीरशैव आचाराप्रमाणे झाल्यास तो जीव 'शीवसावुज्य' मुक्तिचा अधिकारी होतो. प्राणोत्क्रमण होताच त्याला जलस्नान घालून भिंतीच्या आधारे मांडी घालून पूर्वेकडे तोंड करून बसवावे. जंगमाकडून त्याच्या इष्टलिंगावर जलाभिषेक करावा. किंवा मृताचा पुत्र, पौत्र अथवा बंधू यांनी हा विधी करून लिंगाची आरती करून

त्यांच्या डाव्या हातावर लिंग ठेवावा. अनेकांनी येऊन या लिंगाचे व या व्यक्तीचे दर्शन घ्यावे. व तेथेच काही वेळ भजन करीत किंवा शिवनामाचा जप करत थोडा वेळ बसावे.

यावेळी पण गोदान, सुवर्णदान व लिंगदान करावे. हे लिंगदान करताना त्यांच्या पुत्रानी ''पुनरावृत्ति रहित शिवसाजुज्य सिध्दये। इदं संप्रददे तुभ्यं शिवलिंग सुपावनम्'' हा मंत्र म्हणावा. दानाच्या परिपूर्णतेसाठी 'दक्षिणा' अवश्य द्यावी. नाही तर सर्व कार्य व्यर्थ जाते. शिवलिंग दानाचे महत्त्व सर्वश्रेष्ठ आहे. ब्रम्हांडदान दिल्याचे पुण्य एका शिवलिंग दानाने प्राप्त होते.

जोपर्यंत शरीरात प्राण आहे तो पर्यंत, अति सावधानपणाने आचार लिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग व महालिंग याना शरीराचा एकेक अवयव समर्पित करण्याची भावना करावी. हे नाही जमल्यास त्यांच्या पुत्रानी प्राणोत्क्रमण झाल्यानंतर 'आयुवः प्राणं संतनु।। प्राणादपान संतनु' हा मंत्र म्हणून शरीरांतर्गत असलेले पंचप्राण (प्राण,अपान,व्यान,उदान, समान) हे वरील लिंगाला समर्पित केल्याची भावना करावी. नंतर स्थुल, सूक्ष्म, कारण हे तीन देह इष्ट, प्राण व भावलिंगाला समर्पित केल्याची भावना त्याच्या पुत्रानी करावी.

यानंतर शरीरावरील सर्व छिद्रे आकाशाला, श्वासोच्छवास वायूला, शरीरातील उष्णता अग्नीला, रक्त जलाला, कफनवाद याचेही विसर्जन अग्नीत केल्याची भावना करावी आणि पृथ्वी तत्वाला शरीरातील अस्थि, मांस, मज्जा इत्यादि कठिण भाग विसर्जित केल्याची भावना करावी.

या प्रमाणे स्थूलदेह पंचमहाभूतात विलीन केल्याची भावना केल्यानंतर सूक्ष्म शरीराचे अवयव ज्याचे त्याला देऊन टाकावेत.दीक्षा प्राप्त झालेल्या वीरशैवांनी या स्थूल शरीराच्या एकेका भागाला स्पर्श करून किंवा भावनेने तो तो भाग समर्पण करावा.

या नंतर अग्नीला वागिन्द्रिय (वाचा) इंद्राला माणीन्द्रिय (हात), विष्णूला गमनशक्ति, पाय, प्रजापतीला, रतिक्रियासह उपस्थेन्द्रिय, (मूत्रेंद्रिय) आणि यम या देवतेला पायु (गुद) हे मल विसर्जन इंद्रिय अर्पण केल्याची भावना करावी. यानंतर 'शब्द' हा विषय दिशाला (श्रोत्रेन्द्रिय) स्पर्शभावना (त्वगेन्द्रिय) त्वचा वायुला, चक्षू-रुपइंद्रिय सूर्याला, रसनेंद्रिय (जीभ) वरुणाला, गंध (नाक) अश्विनी कुमाराना, ब्रम्हदेवाला बुध्दी व अहंकार, रुद्राला अर्पण करावे. यामुळे पुनर्जन्म

होत नाही. शेवटी शिवरुपात सर्व चेतना विसर्जित केल्याची भावना करावी.

याप्रमाणे पंचमहाभौतिक शरीर पंचतन्मायात पंचतन्माचा अहंकारात अहंकार महत तत्वात व हे महत् तत्व अव्यक्तात विलीन केल्याची भावना करावी.

शिवसामरस्याच्या प्राप्तीसाठी शरीरावरील लिंग, भस्म व रुद्राक्ष हे कधीच काढू नयेत. ते सुरक्षित ठेवावेत. गुरुकृपेने हे ज्ञान त्या व्यक्तीला असते.

वीरशैवाच्या स्थूल शरीरातील घ्राणेंद्रियात (नाकात) आचारलिंग, जीभेत गुरुलिंग. डोळ्यात शिवलिंग, त्वचेत जंगमलिंग, कानात प्रसाद लिंग. आणि ह्रदयात महालिंग असतात. म्हणून ही इंद्रिय त्या त्या लिंगाला अर्पण केल्याची भावना त्याच्या पुत्रानी पूजा प्रसंगी करावी.

हे स्थूल शरीर जसे त्या त्या लिंगाला अर्पण केले जाते. तद्वत सूक्ष्म शरीर ही अर्पण करावे. उपस्थ अंगात आचारलिंग, पायु अंगात गुरुलिंग, पादस्थानी शिवलिंग, हातस्थानी जंगमलिंग, वाणीत प्रसादलिंग व सर्वअत्मागांत (चित्तात) महालिंग, ही भावना करून समर्पण करावे.

या प्रमाणे अर्पण केल्यास तो जीव केलेल्या सर्व कर्मातून मुक्त होतो. तो शिवस्वरुपात सामरस्य होण्यास योग्य बनतो. हा अर्पण भाव त्या देहाची पूजा करत असताना एकेका भागाला स्पर्श करून तो तो भाग त्या त्या लिंगाला व सांगितल्याप्रमाणे समर्पण करावे व नंतर जंगमाचे पादोदक मृत व्यक्तिच्या तोंडात टाकावे व पूजा करणाऱ्या पुत्रांनी पण ते जंगम पादोदक स्वत: मुखात टाकावे.

हे रुद्रा अंत्य समयाला हे जंगम पादोदक दिल्यास तो जीव कितीही दोषी असला तरी सर्व पापातून मुक्त होतो. शिवाय जी व्यक्ती अंत्य समयाला तीन वेळा शिव–शिव–शिव असे उच्चारण केल्यास तो शिवसायुज्य पावतो. पहिल्या शब्दाने संसार भवाचा छेद होतो. नंतरचे दोन शब्दाने आत्मस्वरुपात तो जीव विलीन होतो.

हे जरी नाही जमल्यास त्यांच्या पुत्रपौत्रानी त्यांच्या उजव्या कानात हे शब्द म्हणावेत. नंतर

''अणुपंथा विततः पुराणो मां स्पृष्टोऽनुवितो मयैव।।

तेन धीरा अपियन्ति ब्रम्हविदः स्वर्ग लोकमित उर्ध्व वियुक्ताः'' (बृह.उप ४.४.८)

यानंतर कापूर लावून आरती करावी.

व हा देह तसाच स्थित बसलेल्या अवस्थेत ठेवावा. वीरशैवाचा मृत देह कधीही आडवा टाकू नये. प्राणोत्क्रमण होताच त्याला भस्मस्नान घालून (सर्व अंगाला भस्म लावून) किंवा जलस्नान घालून आसनावरच बसवून त्यांच्या पुत्रानी पूजा करून वरील भाग पूर्ण करावा. सुवासिनी असेल तर तीच्या पतीने कुंकूवाचा मळवट भरून तिच्या मंगळसुत्राची, बांगड्या सौभाग्य अलंकाराची पूजा करून पाच सुवासिनीने ओटी भरावी.

प्राणोत्क्रमण खाटेवर –बाजावर किंवा पलंगावर झाला असेल तर सूवर्णदान करावे किंवा प्रजापति होम करावा. प्राणोत्क्रमाणानंतर त्यांचा पुत्र, बंधू, पौत्र (नातू), पुत्रीका पुत्र (दौहित्र) हे संस्काराचे अधिकारी असतात. हे नसल्यास, मुलीचा नातू, दत्तक पूत्र किंवा त्याची संतान, पति, पत्नी, पुत्री, भ्रातापुत्र (पुतण्या), पिता, माता, बहिण, बहिन कन्या, कन्येची मुलगी, सून, नातसून व आपले सर्व सात पिढी पर्यंतचे भाऊबंद व इतर मित्र सुहृद जन या सर्वांचा अनुक्रमे संस्कार करण्याचा अधिकार असतो. शिष्य, राजा, सेवक या सर्वांना हा अधिकार आहे.

या देहाला भिंतीला टेकवून बसवावे. येथे कोणीही रडू नये. यांच्यासमोर शिवभजन करावे किंवा प्रत्येकांनी कमीत कमी पाच वेळा, अकरा वेळा किंवा अधिक वेळा शिव स्मरण करवावे.

मृतासाठी नवे वस्त्र, कटीवस्त्र व उत्तरीय वस्त्र (धोतर किंवा उपरणे) एवढेच आणावे.

त्यांच्या समाधीसाठी 'भूनिक्षेप'साठी जागा विशेषत: वीरशैवाच्या कैलास भूमीत (रुद्रभूमीतच) असावी. कारण ही जागा पिढ्यान् पिढ्या कायमची असते. स्वत:च्या शेतातली जागा कालांतराने आपल्याच मालकीची राहील हे सांगता येत नाही. कदाचित ते पुढील वारसाकडून विक्री केली जाईल किंवा त्या जमीनीत सडक–तळे झाल्यास समाधी स्थान नाहिसे होते म्हणून यासाठी वीरशैवाची स्मशानभूमीच योग्य आहे.

अशी जागा शिवालयाच्या जवळ असावी (१०००ते ५००० पांड अंतरावर) किंवा नदी किंवा नाला समीप असावा. किंवा बिल्ववृक्ष तेथे असावा. हे नसल्यास तेथे बिल्ववृक्ष लावणी करून वाढवावा.

ज्या जागेवर समाधी करावयाची आहे ती जागा प्रथम पाणी व भस्म

लावून उदबत्ती लावून पवित्र करून घ्यावी. समाधीचा आकार चौरसाकृती असावा. लांबी पाच पांड व रुंदी पण पांच पांडच असावी. यांची खोली नऊ पांड (कदम) असावी. याला पुर्वेकडून तीन पायऱ्या खोदतानाच तयार कराव्यात. पहिली पायरी एक पांड खोलीवर, दुसरी तेथून दोन पांड खोलीवर तिसरी पायरी दुसऱ्या पायरी पासून तीन पांडावर करावी. हा पांड मृत व्यक्तीच्या पायाचा असावा. नंतर या खड्डयात पश्चिमेच्या बाजूला एक कमान आकृती खोदून घ्यावी. या देवळीची लांबी, रुंदी तीन पावले असावी.

मग या देवळीत शेणपाण्याने ती जागा सारवून घ्यावी. त्यावर भस्माने पट्टे ओढावे. ''मा वो रिषत् खनिता यस्मै चाहं खनामि वः। व्दिपादचतुष्पादस्माकम् सर्व मस्त्वातुरम'' हा मंत्र म्हणत ती जागा सारवून घ्यावी. यावर रांगोळी काढावी. या नंतर ''अग्निरिति भस्म। वायुरितिभस्म। जलमिति भस्म।स्थलमिति भस्म। व्योमेति भस्म।'' हा मंत्र म्हणत या सारवलेल्या जागेवर भस्माचे चूर्ण पसरून टाकावे व चोहोकडे पुष्प पण पसरून टाकावेत.

ही पूर्ण तयारी झाल्यास एक मखर किंवा पाळणा तयार करावा. तो मखर पूर्ण स्वच्छ पाण्याने धुवून त्याच्या शिखरावर भस्माचे धारण करावे. अनेक पुष्पमाला व वस्त्राने त्याच्या तीन्ही बाजू सालंकृत कराव्या.

त्या माणसाला अंगणात बसवून पुन्हा स्नान घालावे. नवीन कपडे अंगावर चढवून–पूजा आसनात भिंतीच्या आधाराने किंवा लोखंडी व लाकडी शिबीकाच्या साह्याने बसवावे. त्याचा इष्टलिंग त्यांच्या डाव्या हातावर ठेवून संपूर्ण रुद्राध्याय किंवा एखादा नमक म्हणून त्या इष्टलिंगाचा अभिषेक करून पूजा व आरती सर्वांनी करून घ्यावी. नंतर तो देह उचलून मखरात बसवावा.

मृतदेहाचा संस्कार प्राणोत्क्रमणापासून २५ घटी अर्थात १० तासाच्या आत करावा. काही कारणाने उशीर झाल्यास पंचगव्याने (गोमूत्र, दुध, दही, तूप, गाईचे शेण) याने स्नान घालून नंतर शुध्द पाण्याने स्नान घालावे. १० घंट्याच्या पुढे तो मृत देह शीळा होतो.

मखर उचलण्यासाठी चार लोक लिंगधारीच असावेत. त्यांच्या कपाळावर त्रिपुण्ड धारण करावे. त्यांची नांवे

१. महोक्ष, २. वृषभ, ३. नंदिश व ४. नंदिकेश्वर अशी आहेत.

मखराच्या पुढे मंगल वाद्य वाजवावीत. शिवभजन करावे. सर्वत्र वाटेने

पुष्पवृष्टी करावी. अधिकाराप्रमाणे सर्वांनी मागून चालावे. नंतर पूजा द्रव्य घेणारा व जंगम हे सर्वांच्या मागे असावेत.

वाटेने मागून चालणाऱ्या सर्वच व्यक्तिनी शिवनामाचा गजर करत चालावे. गाव हद्दीपर्यंत येताच वेशीपर्यंत तो रथ मखर जमीनीवर टेकवून शिववाहक खांदेकरी यांचा क्रम बदलावा. (संसार संबंध संपला) याची खूण म्हणून मृत माणसाच्या सोबत आणलेले धान्य विसर्जित करावे. येथे म्हणावयाचा मंत्र **(श्येना पृथ्वी भवानृक्श रानिवेश नीयच्छानशर्म सप्रथा:)** हे धान्य बहुधा तांदूळच असावे. कारण हे धान्य पुन्हा उगवत नाही. व सर्वात प्रथम याच धान्याचा (साळीचा) शोध लागलेला आहे.

मग ही पेटी किंवा पालखी समाधी स्थानापर्यंत मंगल वाद्य वाजवीतच आणावी. मग समाधी स्थानाजवळ पूर्वेकडे तोंड करून वर ठेवावी. नंतर ही समाधी जागा नवीन वस्त्राने झाकून घ्यावी. नंतर या मृतदेहाला पूर्वाभिमुख त्या समाधी खड्यात स्वस्तिकासनात (मांडी घालून) बसवावे. त्यांच्या डाव्या हातात लिंग देवून **संकल्प: अस्यांतिथौ एवं गुणविशेषण विशिष्ट्यां---गोत्रस्य शर्मन: पितृलिंगस्य प्रित्यर्थ समाध्युपुरी प्रतिष्टीत लिंगस्य प्रथम अहनी कर्तव्ये षोडोपचार पुजनं करिष्यं** जंगमाकडून रुद्राध्याय म्हणवून जलाभिषेक करावा. लिंगाला भस्म, रुद्राक्ष, बिल्व पुष्प, धूप, कर्पूर लावून लिंगाची आरती करावी. तेथेच त्यांच्या पुत्रानी जंगमाची पादपूजा करून ते जंगम पादोदक व एक बेलाचे पान व सूवर्ण त्यांच्या (मृत व्यक्तिच्या मुखात ठेवावे. मृताच्या गळ्यातील सज्जीका (बेल) वारसास देणे लग्न झालेल्या मुलीस देऊ नये)व हातापासून सुत्र वरती शिवलिंगापर्यंत आणावे. नंतर प्रथम भस्माचे गोळे टाकून नंतर मीठ व नंतर माती टाकून तो खड्डा पूर्ण भरून घ्यावा. मीठामुळे ते शरीर नासत नाही. चमड्यासह ते अस्थिला तसेच चिटकून राहते व भस्म हे वीरशैवाचे भूषण आहे. जमीनीतून आलेला देह जमीनीतच विसर्जित करावयाचा असतो. म्हणून वीरशैवाच्या मृत शरीराला दहन क्रिया व जलसमाधी देत नाहीत. वीरशैवांच्या शरीराला दहन केल्यास दहन करणारा नरकाला जातो.

या नंतर 'सर्वस्य प्रति शव' असे म्हणून किंवा ''मूर्धा नं दिवसो अरति पृथिव्या वैश्वानर मृत आजतमग्निम। कर्वा सम्राजमतिथि जनामासन्ना पात्रं जययन्त देवा'' असा मंत्र म्हणत सर्वाना मुख दर्शन देवून मीठाने अगर मातीने तो खड्डा पूर्ण

भरुन घ्यावा. मीठाने व भस्माने अंग झाकीत असताना "ऋतं तपः। सत्यं तपः। श्रुतं तपः। शान्तं तपो दमस्तपः। शमस्तपो दानं तपो यज्ञस्तपः।" असा मंत्र घोष जंगम मूर्तींनी करावा.

नंतर समाधीवर मातीचा लिंग बनवून समाधीवर एक अगर तीन धोंडे ठेवून जंगमाकडून लिंग स्थापना करून त्याची पूजा करून आरती करावी.

ती आरती येणे प्रमाणेच असावी.

**आरती ही तुजला पिताजी आरती ही तुजला ।।धृ।।**

**चुकलो असेल जरी सेवेला।**

**क्षमा करावी मजला ।। आरती ही तुजला ।।१।।**

**बाळपणी मज योग्य पाळीले।**

**शिक्षण देवूनी समर्थ केले।।**

**विसरू कसा मी या चरणाला।।**

**आरती ही तुजला ।।२।।**

**तव कृपेने संसार बहरला।**

**फुला फळानी तो बहरून गेला।**

**कृपा कराहो मजला ।**

**पिताजी आरती ही तुजला ।।३।।**

**दर आठा दिवसाला।**

**येईन मी दर्शनाला ।**

**अभिवचन देता मी तुजला ।। आरती ।।४।।**

नंतर येथेच त्याच्या पुत्रपौत्रानी यशा शक्ति दानधर्म करावा. हे दान दशविध प्रकारचे असते गो, भूमि, तिल, सुवर्ण, घृत, वस्त्र, अन्न, गुळ, चांदी, मीठ हे दशदान आहेत.

ही सर्व अंत्य क्रिया करून घरी यावे. घरी सारवलेल्या जागेवर दक्षिणमुखी दिवा लावलेला असतो तेथेच भस्म असते. हातपाय धुवून किंवा स्नान करून तेथेच अमृतवल्ली हरळी (दुर्वा) समर्पण करून नमस्कार करून थोडे बसून इतरानी गमन करावे. सर्वांच्या नंतर पुत्रानी तो दिप व धान्य भरलेला तांब्या जंगमाला दान द्यावा.

नंतर स्थापित लिंगाच्या शांती करीता त्या लिंगावर दुसरे दिवशी (मृत्यूच्या

तिसऱ्या दिवशी दुग्धाभिषेक करावा.) वीरशैवात पींडदान करून कावळ्याची वाट पाहवयाची नसते. ज्यांचा जीव पितरलोकात जातो त्यांच्याकरीता हा विधी असतो. वीरशैव शिवसामरस्यात जातात.

या नंतर दहा दिवस पर्यंत त्या लिंगाला सांभाळावे. जमल्यास दहा दिवसापर्यंत दूधाभिषेक करावा.

**समाधि स्थापित लिंगं दशाहन्न विचालयेत्।**
**जन्त्वादिभिर्विचलिते यथा स्थानं निधाय तत।।**

पुनः स्थापिक करताना तीन वेळा प्राणायाम करून स्थापन करावा व ॐ भूः। ॐ भूवः ॐ स्वः असा तीन वेळा जप करून तो लिंग किंवा दुसरा मातीचा लिंग स्थापन करावा.

दहा दिवसापर्यंत क्रमाक्रमाने एकेक अवयव विलीन होतात. मूर्धा, नासिका, नेत्र, मान (ग्रीवा), वक्ष, भूज, नाभि, गुद, लिंग, उर चर्म शिरा, रोम, वीर्य, तृप्ती इत्यादि अवयव समरसून जातात.

अकराव्या दिवशी समाधी बांधून त्यावर पाषणाच्या शिवलिंगाची स्थापना करावी. त्यावर रूद्राभिषेक विधी करावा व अकरा जंगमाना भोजन घालावे. दक्षिणा द्यावी. यालाच 'रुद्राराधना' म्हणतात या दिवशी कट्याला (सांड)सोडावा. तो लाल, पांढरा किंवा काळा असावा.

या नंतर पन्नास रुद्राराधना (जंगम भोजन) बाराव्या दिवशी करावे. या वेळी पुत्राने केशवपन (मुंडन)करून सचैल स्नान करावे. कारण चोरी, खून, इत्यादीदोष केसाच्या आश्रयाने राहतात. वपन करताना शेंडी अवश्य ठेवावी.

याच दिवशी पन्नास रुद्र भोजन म्हणजे जंगमार्चना करावी. आचार लिंगाचे चार, गुरुलिंगाचे सहा, शिवलिंगाचे दहा, जंगमलिंगाचे बारा, प्रसादलिंगाचे सोळा व महालिंगाचे दोन असे पन्नास रुद्रभोजन (जंगमार्चना करावी) हे षड्लिंग व षट्स्थलाला आधार आहेत.

१. आचार लिंगाचे रुद्र (खड्गेश, वकेश, श्वेत, भृगीश्वर = ४)
२. गुरुलिंगाचे ६ (छगलंकेश, द्विरंडेश, महाकालिश्वर, भूजंगेश, पिनाकिश, दारुकिरा)
३. शिवलिंगाचे १० (अर्धनारिश, उमाकांत, आषाढीर, दंडीश,अत्रिश, मित्रेश,मेषेश,लोहितेरा, शिशिश्वर,क्रोधेश)

४. जंगम लिंगाचे १२ (चंड, पंचांतकेश्वर, शिवोत्तम, एक रुद्रेश कुर्मेश, एकनेत्र, चतुरानमेश, अजेश,शर्व, सोमेश्वर, लांगणिरा, संवर्तकेश)

५. प्रसाद लिंगाचे १६ (श्रीकण्ड, अनंतेश, सुक्ष्मेश, त्रिमूर्तीश, अमरेश, अर्धेश भारभूतेश्वर, अतिथीश, स्थानवीरा, हर, झिण्टिरा, भौतितकेश, सयोजातेश, अनुग्रहेश्वर, अक्रुरेश, महासेन)

६. महालिंगाचे रुद्रगण २ (लकुलिरा, शवेश्वर)

इतक्या जंगमाना ऐपती प्रमाणे भोजन देवून दक्षिणा द्यावी.

एखादे प्रसंगी वीरशैव कुलोत्पन्न व्यक्तीची दीक्षा झालेली नसली तर याच विधीने त्याची अंत्य क्रिया करावी. सर्व दोष नाहीसे होतात.

जर एखादे प्रसंगी दूरदेशीचा पुत्र, बंधू, प्रपुत्र, इत्यादि आला तर त्यांनी फक्त समाधी दर्शन घ्यावे. पूर्ण विधी करण्याची गरज नाही.

जंगमाला पांच ताम्रपात्र व दिनचर्यैचे इतर साहित्य आपल्या ऐपती प्रमाणे दान देवून (अमृत आत्म्याची नित्यदिनचर्या आज संपली असे म्हणून) दान करावे व "माझ्या पित्याला, त्यांचा पिता, त्यांचा प्रपिता, इत्यादित सामावून घेण्याची प्रार्थना करावी."

बाराव्या दिवशी पुन्हा एका जंगमाला बोलावून मृत व्यक्तीच्या जीवभावाच्या निवृत्तीसाठी व त्याचा पिता, आजोबा, पंजोबा यांच्या प्रमाणेच माझा पिता शिव सायुज्य पावो ही प्रार्थना करावी.

जंगमाच्या समोर बसून "सद्योजातं प्रपद्यामि सद्योजाताय वै नमो नमः। भवे भवे नाति भवे भवस्व मां भवोद्भवाय नमः।। " असा जंगमाने मंत्र म्हणून त्याच्या सर्व कला छतीस कलामध्ये मिसळल्याची भावना करावी. हा संकल्प कर्त्यांनी (पुत्रानी) माझ्या पित्याला शिवस्वरूप झालेल्या पितामह प्रपितामहाच्या शिवस्वरूपात ऐक्य होत असल्याची भावना करावी.

अशा प्रकारे बाराव्या दिवशी 'तत्वसयोजन' विधी पूर्ण करून प्रतिवर्षाचा समाधिभिषेक व जंगमार्चनाचा संकल्प करावा.

**समाप्त**

नोट

१. सूर्यास्तानंतर अंत्यक्रिया करू नये.

२. रात्रीच्या शेवटच्या प्रहरामध्ये म्हणजे पहाटे प्राणोत्क्रमण झाल्यास उजाडता दिवस धरावा.

३. प्रेतावर गुलालाऐवजी भस्मचुर्ण टाकावे.

## स्मशानात म्हणण्यायोग्य आरत्या

..१..

जयदेव जयदेव आत्मया रामा ।
निगमागम शोधीता न कळे गुणसीमा ।।धृ.।।
नानादेही देव एक विराजे ।
नाना नाटक लीला सुंदर रुप साजे ।
नाना तीर्थ क्षेत्री अभिनव गति माजे ।
अगाध महिमा पिंड ब्रम्हाडी गाजे ।।१।।
बहुरूपी बहुगुणी बहुता काळाचा ।
हरिहर ब्रम्हादिक देवी सकळांचा ।
युगानुयुगी आत्माराम आमुचा ।
दास म्हणे महिमा न बोलवे वाचा ।।२।।
धन्य बसवराज यांची होती आरती ।।

...२...

ॐनमो नंदी हरहर शिवशिव भक्त गर्जती।।धृ।।
प्रताप तुझा थोर शिवासी, धरिला स्वयंवर ।।
तिन्ही देव जिंकूी घेतला सृष्टीचा भार ।।१।।
पृष्ठावरती स्वार होवूनी, उमाशंकर ।।
वधिलात्रिपूर दूर केला, दैत्य संचार ।।२।।
धोपेश्वरा बसवराजा विवेक अंतर ।।
अनंतनाम एकलिंग भक्ति सादर ।।३।।

### कर्पुरार्ती

कर्पुरगौरं करुणावतारं, संसारसारं भुजगेंद्रहारं ।
सदावसंतं ह्रदयारविंदं, भवंभवानि सहितं नमामि।
गुणातीतकांतं परब्रम्हशांतं,
सुविद्यादिदेवं भवारण्यदाहं।
उमानाथमीशं जराजन्मनाशं,
परं ज्योति लिंगं नमामीष्टलिंगम्।
श्री लिंगरुपिने जीवात्मने नमः
कर्पूरदीपेन नीराजयामि।

## मणावळ

गण म्हणे जे शिवनाम उच्चारिती ।

शिवदीक्षाघेती ॥

त्या गुरुपुत्रा शिवसायुज्यता प्राप्ती ।

येर सर्व भुते होती ॥१॥

सर्वजण म्हणा ॐ नमः शिवाय ॥धृ॥

करुनी साक्षात् गणाधीश्वर भक्ति।

मुक्तिसी कारण होय ती।

सर्वकुळ्या उध्दती ।

शिवभक्त शिवैक्य होती ॥२॥ (सर्वजण)

सद्गुरुजंगम पादोदके ।

मिळविले जीवन कर्म जितुके ॥

केले एकमूर्तींस अर्पण नेमके ।

तेणे सुजीवलिंगैक्य पार्वती ॥३॥ (सर्वजण)

सातशेत्रेसष्ठ शिवगण मूर्ती ।

त्या पूजीता शिवासी तृप्ती ॥

त्या अवतरता स्मशानावरती ।

तेणे जीवात्म्यास चिरंतन शांति ॥४॥ (सर्वजन)

स्वर्ग लोकीचे अकरा कोटी।

पाताळ लोकीचे अकरा कोटी ।

मृत्यूलोकीचे अकरा कोटी।

गाईचे पुच्छ धरून.... कैलासाला जाती ॥५॥

## गजर करावा

जय मंगलम जय नमः पारवते पतये शिव हर-हर महादेव, श्रीमद् जगद्गुरू पंचाचार्य महाराज की जय, (मृत झालेल्या व्यक्तीच्या गुरूच्या नावाचा गजर करावा) आत्मलिंग महाराज की जय

## पुंष्पांजली

ॐ यज्ञेन यज्ञमयजंतदेवा स्तानी धर्माणि प्रथमान्यासन् । तेहनाकं महिमानः सचंत यत्रपुर्वे साध्या सन्ती देवाः आत्मलिंग चरणारविंदर्यो पुंष्पांजली समर्पयामी

## * अथ श्री रूद्राध्यायेन महाभीषेक *

हरःॐ

अस्य श्रीरूद्रस्य प्रश्नस्य । अनुष्टुप् छंदः अघोरऋषिः ।संकर्षणमूर्तिस्वरूपो योऽसावादित्यः परम पुरूषस्य एष रूद्रो देवता ।अग्नीक्रतुचरमायामिष्टिकायांगँ् शतरूद्रीयजपाभिषेकयोर्विनियोगः ।। सकलस्य रूद्राध्यायस्य श्रीरूद्रो देवता । एका गायत्रीच्छंदः । त्रिस्त्रोऽनुष्ट, भस्तिस्त्रः । पंक्तयस्ससप्तानुष्टुभो व्दे जगत्यौ श्री परमेष्ठी ऋषीः । श्री परमेश्वरप्रीत्यर्थे शतरूद्रीय जपेऽभिषेके च विनियोगः ।।

## * अथ करन्यासः *

ॐ अग्निहोत्रात्मने–अंगुष्ठाभ्यां नमः ।

ॐ दर्शपूर्णमासात्मने–तर्जनीभ्यां नमः ।

ॐ चातुर्मास्यात्मने–मध्यमाभ्मां नमः ।

ॐ निरूढपशुबंधात्मने–अनामिकाभ्यां नमः ।

ॐ ज्योतिष्टोमात्मने–कनिष्ठिकाभ्यां नमः ।

ॐ सर्वक्रत्वात्मने–करतलकरपृष्ठाभ्यां नमः ।।

## * अंगन्यास *

ॐ अग्निहोत्रात्मने – ह्रदयाय नमः ।

ॐ दर्शपूर्णमासात्मने – शिरसे स्वाहा ।

ॐ चातुर्मास्यात्मने – शिखायै वषट् ।

ॐ निरूढपशुबंधात्मने – कवचाय हुं ।

ॐ ज्योतिष्टोमात्मने – नेत्रत्रयाय वौषट् ।

ॐ सर्वक्रत्वात्मने – अस्त्राय फट् ।

ॐ भूर्भुवस्सुवरोमिति दिग्बंधः ।।

## * अथ ध्यानं *

आपातालनभः स्थलांतभुवनब्रह्मांडमाविस्फुर
ज्योतिस्फाटिकलिंगमौलिविलसत्पूर्णेंदुवांतामृतैः ।।
अस्तोकाप्लुतमेकवारमनिशं रूद्रानुवाकान् जपन् ।
ध्यायेदीप्सितसिद्धये धृवपदं विप्रोभिषिंचेच्छिवम् ।।
ब्रह्मांडव्याप्तदेहा भसितहिमरूचा भासमाना भुजंगैः ।
कंठे कालाः कपर्दाकलितशशिकलाश्चंडकोदंडहस्ताः ।।
त्र्यक्षा रूद्राक्षभुषास्सुललितविभवाशांभवा मुर्तिभेदाः ।
रूद्राः श्रीरूद्र सूक्तप्रकटितविभवा नः प्रयच्छंतु सौख्यम् ।।
शुद्धस्फटिकसंकाशं शुद्धविद्याप्रदायकं । शुद्धं पूर्णचिदानंद
सदाशिवमहं भजे ।।

**ॐ नमो भगवते रूद्राय ॐ नमः**

**हरःॐ**

नमस्ते रूद्र मन्यव उतोत इषवे नमः । नमस्ते अस्तु धन्वने बाहुभ्यामुत ते नमः । या त इषुश्शिवतमा शिवं बभूव ते धनुः । शिवाशरव्या या तव तया नो रूद्र मृडय । या ते रूद्र शिवा तनूरघोराऽपापकाशिनी । तया नस्तनुवा शंतमया गिरिशंताभिचाकशीहि । यामिषुंगिरिशंत हस्ते । बिभर्षस्तवे । शिवां गिरी त्रतां कुरू मा हिग्ं सीः पुरूषं जगत् । शिवेन वचसा त्वा गिरीशाच्छा वदामसि । यथा नस्सर्वमिज्जगद्‌यक्ष्मगँ सुमना असत् । ध्यवोचदधिवक्ता प्रथमो दैव्यो भिषक । अहीगँश्च सर्वान्जंभयन्तसर्वाश्च यातु धान्यः । असौ यस्ताम्रो अरूण उत बभ्रुस्सुमंगलः । ये चेमागँ रूद्राअभितो दिक्षू । श्रितास्सहस्त्रशोऽवैषागँ हेड ईमहे । असौ योऽवसर्पति नीलग्रीवो

विलोहितः । उतैनं गोपो अदृशन्नदृशन्नुदहार्यः । उतैनं विश्वाभुतानि स दृष्टो मृडयातिनः । नमो अस्तुनीलग्रीवाय सहस्त्राक्षाय मीढुषे । अथो ये अस्य सत्वानोऽहं तभ्योऽकरं नमः। प्रमुंच धन्वनस्त्वमुभयोरार्त्नियोर्ज्या । याश्च ते हस्त इषवः परा ता भगवो वप । अवतत्यधनुस्त्वग् सहस्त्राक्ष शतेषुधे । निशीर्य शल्यानां मुखा शिवोनस्सुमना भव । विज्यं धनुः कपर्दिनो विशल्यो बाणवाँ् उत । अनेशन्नस्येषव आभुरस्य निषंगथीः । या ते हेतिर्मीढुष्टम हस्ते बभूव ते धनुः । तयास्मान् विश्वतस्त्वमयक्ष्मया परिब्भुज । नमस्ते अस्त्वायुधायानातताय धृष्णवे उभाभ्यामुत ते नमो बाहुभ्यां तव धन्वने । परि ते धन्वनो हेतिरस्मान्वृणत्तकु विश्वतः । अथो य इषुधिस्तवारे अस्मन्नीधेहि तं । नमस्ते अस्तु भगवन् विश्वेश्वराय महादेवाय त्र्यंबकाय त्रिपुरूषाय त्रिपुरांतकाय त्रिकाग्निकालाय कालाग्निरूद्राय नीलकंठाय मृत्युंजयाय सर्वेश्वराय सदाशिवाय श्रीमन्महादेवाय नमः ।।

।। इति प्रथमोऽनुवाकः।।

हरःॐ

ओंनमो हिरण्यबाहवे सेनान्ये दिशां च पतये नमो । नमो वृक्षेभ्यो हरिकेशेभ्यः पशूनां पतये नमो । नमस्सस्पिंजराय त्विषीमते पथीनां पतये नमो । नमो बभ्लुशाय विव्याधिनेऽन्ननांपतये नमो । नमो हरिकेशायोपवीतिने पुष्ठानां पतये नमो । नमो भवस्य हेत्यै जगतां पतये नमो । नमो रूद्रायाततताविने क्षेत्राणां पतये नमो । नमस्सूतायाहंत्याय वनानां पतये नमो । नमः रोहितायस्थपतये वृक्षाणां पतये नमो । नमो मन्त्रिणे वाणिजाय कक्षाणां पतये नमो । नमो भुवन्तये वारिवस्कृतायौषधीनां पतये नमो । नमः उच्चैर्घोषायाक्रन्दयते पत्तीनां पतये नमो । नमः कृत्स्नवीताय धावते सत्वनां पतये नमः ।

।। इति द्वितीयोऽनुवाकः ।।

हर:ॐ

ओं नमस्सहमानाय निव्याधिन आव्याधिनीनां पतये नमो । नम: ककुभाय निषंगिणे स्तेनानां पतये नमो । नमो निषंगिण इषुधिमते तस्कराणां पतये नमो । नमो वंचते परी वंचते स्तायुनां पतेय नमो । नमो निचेरवे परिचरायारण्यानां पतये नमो । नमस्सृकाविभ्यो जिघाग्ँसद्भ्यो मुष्णतां पतये नमो । नमोऽसिमदभ्यो नत्त्कं चरद्भय: प्रकृंतानां पतये नमो । नम उष्णीषिणे गिरिचराय कुलुंचानां पतये नमो । नम: इषुमभ्दयो धन्वाविभ्यक्ष्च वो नमो । नम आतन्वानेभ्य : प्रतिदधानेभ्यश्चवो नमो । नम आयच्छभ्द यो विसृजद्भ्यश्च वो नमो । नमोऽस्यभ्दयो विध्यभ्दश्च वो नमो । नम आसीनेभ्यश्शयानेभ्यश्च वो नमो । नम: स्वपभ्दयो जाग्रभ्द्रयश्च वो नमो । नमस्तिष्ठभ्दयो धावभ्दयश्च वो नमो । नमस्सभाभ्यस्सभापतिभ्यश्चवो नमो । नमो अश्वेभ्योऽ श्वपतिभ्यश्व वो नम: ।

॥ इति तृतीयोऽनुवाक: ॥

हर:ॐ

ओऽम ओं नम आव्याधिनीभ्यो विविध्यंतीभ्यश्च वो नमो । नम उगणाभ्यस्तृगँ् हतीभ्यश्च वो नमो । नमो गृत्सेभ्यो गृत्सपतिभ्यश्च वो नमो । व्रातेभ्यो व्रातपतिभ्यश्च वो नमो । गणेभ्यो गणपतिभ्यश्च वो नमो । नमो विरूपेभ्यो विश्वरूपेभ्यश्च वो नमो । नमो महभ्दय: क्षुल्लकेभ्यश्च वो नमो । नमो रथिभ्योऽरथेभ्यश्च वो नमो । नमो रथेभ्यो रथपतिभ्यश्च वो नमो । नम: सेनाभ्य: सेनानिभ्यश्च वो नमो । नम: क्षत्तृभ्य: संग्रहीतृभ्यश्च वो नमो । नमस्तक्षभ्यो रथकारेभ्यश्च वो नमो । नम: कुलालेभ्य: कमरिभ्यश्च वो नमो । नम: पुञ्जिष्टेभ्यो

निषादेभ्यश्च वो नमो । नमो गृगयुभ्यः श्वनिभ्यश्च वो नमो । नमः श्चभ्यः श्वपतिभ्यश्च वो नमः ।।

।। इति चतुर्थोऽनुवाकः ।।

हरःॐ

ॐनमो भवाय च रूद्राय च । नमः शर्वाय च पशुपतये च । नमो नीलग्रीवाय च शितिकण्ठाय च । नमः कपर्दिने च व्युप्तकेशाय च । नमः सहस्त्राक्षाय च शतधन्वने च । नमो गिरीशाय च शिपिविष्टाय च । नमो मीढुष्टमायचेषुमते च । नमो ऱ्हस्वाय च वामनाय च । नमो बृहते च वर्षीयसे च । नमो वृद्धाय च संवृध्वने च । नमो अग्रियाय च प्रथमाय च । नमः आशवे चाजिराय च । नमः शीघ्रियायच शीभ्यांय च । नम ऊर्म्याय चावस्वन्याय च । नमः स्त्रोतस्याय च द्वीप्याय च ।

।। इति पंश्चमोऽनुवाकः ।।

हरःॐ

ॐ नमो ज्येष्ठाय च कनिष्ठाय च । नमः पूर्वजाय चापरजाय च । नमो मध्यमाय चापगल्भाय च । नमो जधन्याय च बुध्नियाय च । नमः सोभ्याय च प्रतिसर्याय च ।नमो याम्याय च क्षेम्याय च । नम उर्वर्याय च खल्याय च। नमः श्लोक्याय च चावसान्याय च । नमो वन्याय च कक्ष्याय च ।नमः श्रवाय च प्रतिश्रवाय च । नमः आशुषेणाय चाऽऽशुरथाय च । नमः शुराय चावभिन्दते च । नमो वर्मिणे च वरूथिने च । नमो बिल्मिने च कवचिने च । नमः श्रुताय च श्रुतसेनाय च ।।

।। इति षष्ठोऽनुवाकः ।।

हर:ॐ

ॐ नमो दुन्दुभ्याय चाऽऽहनन्याय च । नमो धृष्णवे च प्रमृशाय च । नमो दुताय च प्रहिताय च । नमो निषगिणेचे षुधिमते च । नमस्तीक्ष्णेषवे चाऽयुधिने च । नमः स्वायुधाय च सुधन्वने च । नमः स्त्रुत्याय च पथ्याय च । नमः काट्याय च नीप्याय च । नमः सूद्याय च सरस्याय च । नमः नाद्याय च वैशन्ताय च । नमः कूप्याय चावटयाय च । नमो वर्ष्याय चावर्ष्याय च । नमो मेघ्याय च विद्युत्याय च । नम ईध्रियाय चाऽऽतप्याय च । नमो वात्याय च रेष्मियाय च । नमो वास्तव्याय च वास्तुपाय च ।।

।। इति सप्तमोऽनुवाकः ।।

हर:ॐ

ॐनमः सोमाय च रूद्राय च । नमस्ताम्रायचारूणाय च । नमः शशंगाय च पशुपतये च । नम उग्राय च भीमाय च । नमो अग्रेवधाय च दूरेवधाय च । नमो हन्त्रे च हनीयसे च । नमो वृक्षेभ्य हरिकेशेभ्यो । नमस्ताराय तारकाय च । नमः शम्भवे च मयोभवे च । नमः शशंकराय च मयस्कराय च । नमः शिवाय च शिवतराय च । नमस्तीर्थ्याय च कूल्याय च । नमः पार्याय चावार्याय च । नमः प्रतरणाय चोत्तरणाय च । नम आतार्याय च चाऽऽलाद्याय च । नमः शष्प्याय च फेन्याय च । नमः सिकत्याय च प्रवाह्याय च ।।

।। इति अष्टोऽनुवाकः ।।

हर:ॐ

ॐनम इरिण्याय च प्रपथ्याय च । नमः किगँ शिलाय च क्षयणाय च । नमः कपर्दिने च पुलस्तये च नमः काट्याय च गह्वरेष्ठाय च ।

नमस्तल्प्याय च गेह्याय च । नमः काट्याय च गह्वरेष्ठाय च । नमो हृदय्याय निवेष्प्याय च । नमः पागँ सव्याय च रजस्याय च । नमः शुष्क्याय च हरित्याय च । नमो लोप्याय चोलप्याय च । नम ऊर्व्याय च सूर्म्याय च । नमः पर्ण्याय च पर्णशद्याय च । नमोऽपगुरमाणाय चाभिघ्नते च । नम आक्खिदते च प्रक्खिदते च । नमो वः किरिकेभ्यो देवानांगँ हृदयेभ्यो । नमो विक्षीणकेभ्यो देवानांगँ हृदयेभ्यो । नमो विचिन्वत्केभ्यो देवानांगँ हृदयेभ्यो । नम आनिर्हतेभ्यो देवानांगँ हृदयेभ्यो । नम आमीवत्केभ्यो देवानांगँ हृदयेभ्यः ॥

॥ इति नवमोऽनुवाकः ॥

हरः ॐ

ॐ द्रापे अन्धसस्पते दरीद्रं नीललोहित । एषां पुरूषाणामेषां पशुनां मा भेर्माऽरो मो एषां किञ्चनाऽऽममत् । या ते रूद्र शिवा तनूः शिवा विश्वाहभेषजी । शिवा रूद्रस्य भेषजी तया नो मृड जीवसे । इमागँ रूद्राय तवसे कपर्दिने क्षयद्वीराय प्रभरामहे मतिम् । यथा नः शमसद्द्विपदे चतुष्पदे विश्वं पुष्टं ग्रामे अस्मिन्ननातुरम् । मृडा नो रूद्रो तनो मयस्कृधि क्षयद्वीराय नमसा विधेम ते । यच्छं च योश्च मनुरायजे पिता तदश्याम तव रूद्र प्रणीतो । मा नो महान्तुम मा नो अर्भकं मा न उक्षन्तमुत मा न उक्षितम् । मा नो वधीः पितरं मोत मातरं प्रिया मा नस्तनुवो रूद्र रीरीषः । मा नस्तोके तनये मा न आयुषि मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः । वीरान् मा नो रूद्र भामितो वधीर्हविष्मन्तो नमसा विधेम ते । आरात्ते गोघ्न उत पूरूषघ्ने क्षयद्द्वीराय सुम्नमस्मे ते अस्तु । रक्षा च नो अधि च देव ब्रूह्यधा च नः शर्म यच्छ द्विबर्हाः । स्तुहि श्रुतं गर्तसदं युवानं मृगन्नभीममुपहत्नुमुंग्रं । मृडा जरित्रे रूद्र स्तवानो अन्यं

ते अस्मन्निवपन्तु सेना : । परिणो रूद्रस्य हेतिर्वृणत्त्कु परि त्वेषस्य दुर्मतिरघायोः । अवस्थिरा मघवभ्दयस्तनुष्व मीढ्वस्तोकाय तनयाय मृडय । मीढुष्टम शिवतम शिवो नः सुमना भव । परमे वृक्ष आयुधं निधाय कृत्तिं वसान आचर पिनाकं बिभ्रदागहि । विकिरिद विलोहित नमस्ते अस्तू भगवः । यास्ते सहस्त्रगँ‌ॐ हेतयोऽन्यमस्मन्निवपन्तु ताः । सहस्त्राणि सहस्त्रधा बाहुवोस्तव हेतयः । तासामीशानो भगवः पराचीना मुखा कृधि ।

॥ इति दशामोऽनुवाकः ॥

हर:ॐ

ॐसहस्त्राणि सहस्त्रशो ये रूद्रा अधि भूम्याम् । तेषागँ सहस्त्रयोजनेऽव धन्वान तन्मसि । अस्मिन् महत्यर्णवेऽन्तरिक्षे भवा अधि । (तेषागँ) नीलग्रीवाः शितिकण्ठाः शर्वा अधः क्षमाचराः । (तेषागँ) नीलग्रीवाः शितिकण्ठा दिवगँ रूद्रा उपश्रिताः । (तेषागँ) ये वृक्षेषु सस्पिञ्जरा नीलग्रीवा विलोहिताः । (तेषागँ) ये भूतामधिपतयो विशिखासः कपर्दिनः । (तेषागँ) ये अन्नेषु विविध्यन्ति पात्रेषुपिबतोजनान् । (तेषागँ) ये पथां पथिरक्षय ऐलबृदायव्युधः । (तेषागँ) ये तीर्थानि प्रचरन्ति सृकावन्तो निंषग्ङिणः । (तेषागँ) य एतावन्तच्श्र भूयागँ सच्श्र दिशो रूद्रा वितस्थिरे । (तेषागँ) सहस्त्रयोजनेऽव धन्वानि तन्मसि नमो रूद्रेभ्यो ये पृथिव्यां येऽन्तरिक्षे ये दिवि येषामन्नं वातो वर्षमिषवस्तेभ्यो । दश प्राचीर्दश दक्षिणा दश प्रतीचीर्दशोदीचीर्दशोर्ध्वास्तेभ्यो नमस्ते नो मृडयन्तु ते यं द्विष्मो यश्च नो द्वेष्टितं वो जम्भे दधामि ॥

॥ इति एकादशोऽनुवाकः ॥

हर:ॐ

त्र्यंम्बकं यजामहे सुगन्धिं पुष्टिवर्धनम् । उर्वारूकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् । यो रूद्रो अग्नौ यो अप्सु य ओषधिषू यो रूद्रो विश्वा भुवनानि विवेश तस्मै रूद्राय नमो अस्तू । अयं मे हस्तो भगवानयं मे भगवत्तर: । अयं मे विश्वभषजो यं शिवाभिमर्षन: । ये ते सहस्त्रमयुतं पाशा मृत्योर्मर्त्याय हन्तवे । तान् यज्ञस्य मायया सर्वानवयजामहे । मृत्यवे स्वाहा: मृत्यवे स्वाहा: । ॐ प्राणानां गंथिरसी रूद्रोमा विशांतकस्तेनान्नेनाप्यायस्व । ओं नमो भगवते रूद्राय शंभवे मृत्युर्मे पाहि । सदाशिवोम् अपमृत्युर्नस्यतु आयुर्वर्धताम् । ओं शांति: शांति: शांति:

## अथ चमकाध्याय:

हर:ॐ

ॐअग्नाविष्णु सजोषसे मा वर्धन्तु वां गिर: । द्युम्नैर्वाजेभिरा गतम् वाजश्च मे प्रंसवश्च मे । प्रयश्च मे प्रसितिश्च मे । धीतिश्च मे क्रतुश्च मे । स्वरश्च मे श्लोकश्च मे । श्रावश्च मे श्रुतिश्च मे । ज्योतिश्च मे सुवश्च मे । प्राणश्च मे।पानश्च मे । व्यानश्च मेऽसुश्च मे । चित्तं च म अधीतं च मे । वाक् च मे मनश्च मे । चक्षुश्च मे श्रोत्रं च मे । दलश्च मे बलं च मे । ओजश्च मे सहश्च म । आयुश्च मे जरा च म । आत्मा च मे तनूश्च मे । शर्म च मे वर्म च मे । ऽग्ङानि च मेऽस्थानी च मे । परूगंषि च मे शरीराणि च मे ।

॥ इति प्रथमोऽनुवाक: ॥

हर:ॐ

ॐजेष्ठं च म आधिपत्यं च मे । मन्युश्च मे भामश्च मेऽमश्च मेऽम्भश्च मे जेमा च मे महिमा च मे । वरिमा च मे प्रथिमा च मे ।

वर्ष्मा च मे द्राघुया च मे । वृद्धं च मे वृद्धिश्च मे । सत्यं च मे श्रद्धा च मे । जगच्च मे धनं च मे । वशश्च मे त्विषिश्च मे । क्रीडा च मे मोदश्च मे । वित्तं च मे वेद्यं च मे । भूतं च मे भविष्यच्च मे । सुगं च मे सुपथं च मे । ऋद्धं च म ऋद्धिश्च मे । क्लृप्तं च मे क्लृप्तिश्च मे । मातिश्च मे सुमतिश्च मे ।।

।। इति द्वितीयोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐशं च मे मयश्च मे । प्रियं च मेऽनुकामश्च मे । कामश्च मे सौमनसश्च मे । भद्रं च मे श्रेयश्च मे । वश्यश्च मे यशश्च मे । भगश्च मे द्रविणं च मे । यन्ता च मे धर्ता च मे । क्षेमश्च मे धृतिश्च मे । विश्वं च मे महश्च मे । संविश्च मे ज्ञात्रं च मे । सूश्च मे प्रसूश्च मे । सीरं च मे लयश्च म । ऋतुं च मेऽमृतं च मे । यक्ष्मं च मेऽनामयश्च मे । जीवातुश्च मे दीर्घयुत्वं च मे । ऽनमित्रं च मेऽभयं च मे । सुगं च मे शयनं च मे । सूषा च मे सुदिनं च मे ।।

।। इति तृतीयोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐउर्क् च मे सूनृता च मे । पयश्च मे रसश्च मे । घृतं च मधु च मे । सग्धिश्च मे सपीतिश्च मे । कृषिश्च मे वृष्टिश्च मे । जैत्रं च म औभ्दिद्यं च मे । रयिष्च मे रायश्च मे । पुष्टं च मे पुष्टिश्च मे । विभु च मे प्रभु च मे । बहू च मे भूयश्च मे पूर्णं च मे । पूर्णतरं च मेऽक्षितिश्च मे । कूयवाश्च मेऽन्नं च मे । ऽक्षुच्च मे । व्रीहयश्च मे यवाश्च मे । माषाश्च मे तिलाश्च मे । मुग्दाश्च मे खल्वाश्च मे । गोधूमाश्च मे मसुराश्च मे । प्रियंगवश्च मेऽणवश्च मे । श्यामाकाश्च मे नीवारश्च मे ।।

## ।। इति चतुर्थोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐअश्मा च मे मृत्तिका च मे । गिरीयश्च मे पर्वताश्च मे । सिकताश्च मे वनस्पतयश्च मे । हिरण्यं च मेऽयश्च मे । सीसं च मे त्रपुश्च मे । श्यामं च मे लोहं च मे । ऽग्निश्च म आपश्च मे । वीरूधश्च म ओषधश्च मे । कृष्टपश्च च मेऽकृष्टपश्च च मे । ग्राम्याश्च मे पशव आरण्याश्च यज्ञेन कल्पन्तां । वित्तं च मे वित्तिश्च मे । भूतं च मे भूतिश्च मे । वसु च मे वसतिश्च मे । कर्म च मे शक्तिश्च मे । ऽर्थश्च म एमश्च म । इतिश्च मे गतिश्च मे ।

## ।। इति पंचमोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐ अग्निश्च म इन्द्रश्च मे । सोमश्च म इन्द्रश्च मे । सविता च म इन्द्रश्च मे । सरस्वती च म इन्द्रश्च मे । पूषा च म इन्द्रश्च मे । बृहस्पतिश्च म इन्द्रश्च मे । मित्रश्च म इन्द्रश्च मे । वरूणश्च म इन्द्रश्च मे । त्वष्टा च म इन्द्रश्च मे । धाता च म इन्द्रश्च मे । विष्णुश्च म इन्द्रश्च मे । ऽश्विनौ च म इन्द्रश्च मे । मरूतश्च म इन्द्रश्च मे । विश्वे च मे देवा इन्द्रश्च मे । पृथिवी च म इन्द्रश्च मे । ऽन्तरिक्षं च म इनद्रश्च मे । द्यौश्च म इन्द्रश्च मे । दिशश्च म इन्द्रश्च मे । मूर्धा च मे इन्द्रश्च मे । प्रजापतिश्च म इन्द्रश्च मे ।

## ।। इति षष्ठोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐ अगूँशूश्च मे रश्मिश्च मे । ऽदाभ्यश्च मेऽधिपतिश्च म । उपागूँशुश्च मेऽन्तर्यामश्च म । ऐन्द्रावायवश्च मे मैत्रावरूणश्च म । आश्विनश्च मे

प्रतिप्रस्थानश्च मे । शुक्रश्च मे मन्थी च म । आग्रयणश्च मे वैश्वदेवश्च मे । ध्रुवश्च मे वैश्वानरश्च म । ऋतुग्रहाश्च मेऽतिग्राह्याश्च म । ऐन्द्राग्नश्च मे वैश्वदेवश्च मे । मरूत्वतीयाश्च मे माहेन्द्रश्च म । आदित्यश्च मे सावित्रश्च मे । सारस्वतश्च मे पौष्णश्च मे । पात्नीवृतश्च मे हारियोजनश्च मे ।।

।। इति सप्तमोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐ इध्मश्च मे बर्हिश्च मे । वेदिश्च मे घिष्णियाश्च मे । स्त्रुचश्च मे चमसाश्च मे । ग्रावणश्च मे स्वरवश्च म । उपरवाश्च मे धिषवणे च मे । द्रोणकलशश्च मे वायव्यानि च मे । पूतभृच्च म आधवनीयश्च म । अग्नीध्रं च मे हविर्धानं च मे । गृहाश्च मे सदश्च मे । पुरोडाशाश्च मे पचताश्च मे । ऽवभृथश्च मे स्वगाकारश्च मे ।

।। इति अष्टमोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐ अग्निश्च मे घर्मश्च मे । ऽर्कश्च मे सूर्यश्च मे । प्राणश्च मेऽश्वमेधश्च मे । पृथिवी च मेऽदितिश्च मे । दितिश्च मे द्यौश्च मे । शक्करीरंगुलयो दिशश्च मे । यज्ञेन कल्पन्तां मृक्च मे साम च मे । स्तोमश्च मे यजुश्च मे । दीक्षा य मे तपश्च म । ऋतुश्च मे व्रतं च मे । ऽहोरात्रयोर्वृष्ट्या बृहद्रथन्तरे च मे यज्ञेन कल्पताम् ।।

।। इति नवमोऽनुवाकः ।।

हरः ॐ

ॐ गर्भाश्च मे वत्साश्च मे । त्र्याविश्च मे त्र्यवी च मे । दित्यवाट् च मे दित्यौही च मे । पंचाविश्च मे पंचावि च मे । त्रिवत्सश्च मे

त्रिवत्सा च मे । तुर्यवाट् च मे तुर्यौंही च मे । षष्ठवाच्च मे षष्ठौही च म । उक्षा च मे वशा च म। ऋषभश्च मे वेहच्च मेऽनड्वांश्च मे धेनुश्च म । आयुर्यज्ञेन कल्पतां । प्राणो यज्ञेन कल्पतामपानो यज्ञेन कल्पतां । व्यानो यज्ञेन कल्पतां । चक्षुर्यज्ञेन कल्पतागँ श्रोत्रं यज्ञेन कल्पतां मनो यज्ञेन कल्पतां । वाग्यज्ञेन कल्पतामात्मा यज्ञेन कल्पतां । यज्ञो यज्ञेन कल्पताम् ।।

।। इति दशमोऽनुवाक; ।।

हर:ॐ

ॐ एका च मे तिस्त्रश्च मे पंच्च च मे सप्त च मे नव च म । एकादश च मे त्रयोदश च मे पंच्चदश च मे सप्तदश च मे नवदश च म । एकविगँशतिश्चमे त्रयोविगँशतिश्च मे पंच्चविगँ्शतिश्च मे सप्तविगँ्शतिश्च मे नवविगँ्शतिश्च मे ।एकत्रिगँ्श्च मे त्रयस्त्रिगँश्च मे चतस्त्रश्च मे ऽष्टौ च । मे द्वादश च मे षोडश च मे विगँ्शतिश्च मे चतुविगँ्शतिश्च मेऽष्टाविगँ्शतिश्च मे । द्वात्रिगँ्शतिश्च मे । षट्त्रिगँ्शच्च म चत्वारिगँ्शच्च मे । चतुश्चत्वारिगँ्शच्च मेऽष्टाचत्वारिगँ्शच्च मे । वाजश्च प्रसवश्चापिजश्च क्रतुश्च सुवश्च मुर्धाच व्यश्नियश्चांत्यायनश्चांत्यश्च भौवश्च भुवनश्चाधिपतिश्च ।

।। इति एकादशोऽनुवाक: ।।

हर:ॐ

ॐ इडा देवहूर्मनुर्यज्ञनीबृहस्पतिरूक्थामदानि शगँ्
शिषद्विश्वेदेवास्सूक्तवाच: पृथिवि मातृर्मा माहिगं्सीर्मधुमनिष्ये मधुजनिष्ये मधु वक्ष्यामि मधु वदिष्यामि मधुमतीं देवेभ्यो वाचमुद्यासगं् शुश्रूषेण्यां मनुष्येभ्यस्तं मा देवा अवंतु शोभायै प्रितरोऽनुमदंतु ।। ओं शांति: शांति: शांति: ।।

।। इति चमकाध्याय समाप्त: ।।

## ।। अथ पुरूषसूक्तेन महाभिषेकः ।।

ओं सहस्त्रशीर्षा पुरूषः । सहस्त्राक्षस्सहस्त्रपात् । स भूमि विश्वतो वृत्त्वा । अत्यतिष्ठद्दशांगुलं । पुरूष एवेदगं् सर्व । यभ्दूतं यच्च भव्यं । उतामृतत्वस्येशानः । यदन्नेनातिरोहति । एतावानस्य महिमा । अतो ज्यायागँ्श्च पूरूषः ।।१।। पादोऽस्य विश्वाभूतानि । त्रिपादस्यामृतं दिवि । त्रिपादूर्ध्व उदैत्परुषः । पादोऽस्येहाभवात्पुनः । ततो विष्वङ्व्यक्रामत् । साशनानशने अभि । तस्माद्विराडजायत । विराजो अधि पुरूषः । स जातो अत्यरिच्यत । पश्चाभ्दुमिमथो पुरः ।।२।। यत्परुरूषेण हविषा । देवा यैज्ञमतन्वत । वसंतो अस्यासीदाज्यं । ग्रीष्म इध्मश्शरद्धविः । सप्तास्यासन् परिधयः । त्रिस्सप्त समिधः कृताः । देवा यद्यज्ञं तन्वानाः । अबध्नन् पुरूषं पशुं । तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन् । पुरूषं जातमग्रतः ।।३।। तेन देवा अयजंत साध्या ऋषयश्च ये । तस्माद्यज्ञात्सर्वहुतः । संभृतं पृषदाज्यं । पशूगँ् स्तागँ्श्चक्रे वायव्यान् । आरण्यान् ग्राम्याश्च ये । तस्माद्यज्ञात्सर्वहुतः । ऋचस्सामानि जज्ञिरे छंदागंसि तस्मात् यजुस्तस्मादजायत ।।४।। तस्मादश्वा अजायंत । ये के चोभयादतः । गावो ह जज्ञिरे तस्तात् । तस्माज्जाता अजावयः । यत्पुरूषं व्यदधुः । कतिधा व्यकल्पयन् । मुखं किमस्य कौ बाहू कावूरूपादावुच्येते ।। ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् । बाहू राजन्यः कृतः ।।५।। ऊरू तदस्य यद्वैश्यः । पभ्द्यागँ् शूद्रो अजायत । चंद्रमा मनसो जातः । चक्षोःस्सूर्यो अजायत मुखादिंद्रश्चाग्निश्च । प्राणाद्वायुरजायत । नाभ्या आसीदंतरिक्षं । शीर्ष्णो द्यौस्समवर्तत । पभ्दयां भूमिर्दिशःश्रोत्रात् । तथा लोकागँ् अकल्पयन् ।।६।। वेदाहमेतं पुरूषं महांतम् । आदित्यवर्णं तमसस्तु

पारे । सर्वाणि रूपाणि विचित्य धीरः । नामानि कृत्वाऽभिवदन् यदास्ते । धाता पुरस्ताद्यमुदाजहार । शक्रः प्रविद्वान् प्रदिशश्चतस्त्रः । तमेवं विद्वानमृत इह भवति । नान्यः पंथा अयनाय विद्यते । यज्ञेन यज्ञमयजंत देवाः । तानि धर्माणि प्रथमान्यासन् ते ह नाकं महिमानःस्सचंते । यत्र पूर्वे साध्यास्संति देवाः ।।७।। अद्भ्य;स्संभूतः पृथिव्यैरसाच्च । विश्वकर्मणस्समवर्तताधि । तस्य त्वष्टा विदधद्रूपमेति । तत्पुरूश्षस्य विश्वमाजानमग्रे । वेदाहमेतं पुरूषं महांतम् । आदित्यवर्णं तमसः परस्तात् । तमेवं विद्वानमृत इह भवति । नान्यः पंथा विद्यतेययनाय । प्रजापतिश्चरतिगर्भेअंतः । अजायमानो बहुधा विजायते ।।८।। तस्य धीराः परिजानंति योनिंम् । मरीचीना पदमिच्छंति वेधसः । यो देवेभ्य आतपति । यो देवानां पुरोहितः । पूर्वो यो देवेभ्यो जातः । नमो रूचाय ब्राम्हये । रूचं ब्राह्मं जनयंतः । देवा अग्रे तदब्रुवन् । यस्त्वैवं बाह्मणो विद्यात् । तस्य देवा असन्वशे ।।९।। हीश्च ते लक्ष्मीश्च पत्न्यौ । अहोरात्रे पार्श्वे । नक्षत्राणि रूपंम् । अश्विनौ व्यात्तम् । इष्टं मनिषाण । अमुं मनिषाण । सर्व मनिषाण ।।१०।। ओं तच्छंयोरावृणीमहे गातुं यज्ञाय गातुं यज्ञपतये दैवी स्वस्तिरस्तु नः । स्वस्तिर्मानुषेभ्यः । ऊर्ध्वंजिगातु भेषजंम् शंन्नो अस्तु द्विपदेशं चतुष्पदे ।।११।।

।। ओंम शांतिः शांतिः शांतिः ।।

इति पुरूषसुक्तं समाप्तं

।। अथ सुवासितजलं ।।

स्वाद्वीं त्वा स्वादुना । तीव्रां तीव्रेण । अमृताममृतेन । मधुमतीं मधुमता ।।

श्री रूद्राय नमः कुंकुमकर्पुरकस्तूरीवासितजलेन स्नापयामि । मूलेन शुद्धोदकेन स्नापयामि ।।

**।। अथ अविच्छिन्नधारा ।।**

सप्त प्राणाः प्रभवंति तस्मात्सप्तार्चिषस्समिधस्सप्तजिव्हाः । सप्त इसे लोका येषु चरंति प्राणा गुहाशयां निहितास्सप्त सप्त। अतस्समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्संदंते सिंधवस्सर्वरूपाः । अतश्च विश्वा ओषधयो रसाश्च येनैष भूतस्तिष्ठत्यंतरात्मा ।।

**ॐ भुर्भुवस्सुवः**

ॐ निधनपतये नमः – निधनपतातींकाय नमः

ॐ उर्ध्वाय नमः – उर्ध्वलिंगाय नमः

ॐ हिरण्याय नमः – हिरण्यलिंगाय नमः

ॐ सुवर्णाय नमः – सुवर्णलिंगाय नमः

ॐ दिव्याय नमः – दिव्यलिंगाय नमः

ॐ भवाय नमः – भवलिंगाय नमः

ॐ शर्वाय नमः – शर्वलिंगाय नमः

ॐ शिवाय नमः – शिवलिंगाय नमः

ॐ ज्वलाय नमः – ज्वललिंगाय नमः

ॐ आत्माय नमः – आत्मलिंगाय नमः

ॐ परमाय नमः – परमलिंगाय नमः

।। एतत सोमस्य सुर्यस्य सर्वलिंगगँ् स्थापयति पाणिमंत्रंपवित्रंम् ।।

**।। अथ अभिषेकसमापनं ।।**

आभिर्गीर्भिर्यदतोन ऊनमाप्यायय हरिवो वर्धमानः । यदा स्तोतृभ्यो महि गोत्रा रूजासि भूयिष्ठभाजो अध ते स्याम । ब्रह्म प्रावादिष्म तन्नो

मा हासीतू । ओं शांतिः शांतिः शांतिः ।। ॐ श्री रुद्राय नमः जलाभीषेकोऽस्तु, क्षीराभीषेकोऽस्तु, अमृताभीषेकोऽस्तु, हिरण्याभीषेकोऽस्तु, सुवर्णाभीषेकोऽस्तु ।





